॥ श्रीहरि: ॥

| विषय | पृष्ठक्रमांक |
| --- | --- |

# १ - भक्तवत्सल पांडुरंग

श्रीकृष्णअवतारकालातीलच कथा आहे. 'वाईट प्रवृत्तींचा विनाश आणि सत्प्रवृत्तींचा विस्तार यासाठीच मी वारंवार या मर्त्यलोकी अवतार घेतो,' असे स्वयं भगवंतांचे वचन आहे.

मगधराज जरासंध, एक क्रूर दैत्यराज. त्याने तेवीस अक्षौहिणी सैन्य एकत्र करून यादवांवर हल्ला चढवला. त्या यादवांच्या सेनेला युगंधर श्रीकृष्णाचे छत्र लाभले होते. त्यामुळे जरासंधाचा पराभव निश्चित होता. असे त्याने सतरा वेळा हल्ले केले आणि तो सतराही वेळा पराभूत झाला. अठराव्या वेळी मात्र तो क्रूरकर्मा काळयवन याला घेऊन आला. हा अत्यंत बलवान होता. त्याच्या तोडीचा सामर्थ्यवान त्या काळी भूलोकात कोणीही नव्हता. तो आपली तीन कोटी सेना घेऊन जरासंधाच्या मदतीस आला. त्याने मथुरेला वेढा दिला. श्रीकृष्णाने मथुरावासियांच्या रक्षणार्थ समुद्राच्या उदरात नगरी वसवली. ती सर्व सोयींनी युक्त होती. ती नगरी म्हणजे द्वारकानगरी. सर्वांना त्यांनी आपल्या योगमायेने द्वारकेत नेऊन पोचवले. उर्वरित लोकांच्या रक्षणासाठी त्याने बलरामाला मथुरेतच ठेवले आणि कोणत्याही शस्त्राविना श्रीकृष्ण नगराबाहेर पडले.

श्रीकृष्ण शस्त्र न घेता नगराबाहेर पडले आहेत. आपणही बलशाली आहोत. आपणही एकही शस्त्र न घेता त्यांना पकडू आणि त्यांना पराभूत करू. असा विचार करून काळयवन शस्त्राविनाच भगवंतांचा पाठलाग करू लागला. काळयवनाला हुलकावण्या देत

देत भगवंत दूर दूर एका पर्वताच्या गुहेत गेले. त्या गुहेत एक पुरुष एका शिळेवर झोपला होता. भगवंतांनी आपल्या स्कंधावरील शेला त्या निद्रिस्त गृहस्थाला पांघरला आणि ते स्वत: शिळेआड लपून बसले. काळयवन पाठलाग करत गुहेत शिरला. श्रीकृष्णच शेला पांघरून झोपला आहे, असा त्याचा समज झाला. क्रोधाने बेभान होऊन त्याने शेला ओढला आणि त्याला लाथ मारली. तो गृहस्थ निद्रेतून जागा झाला. त्याने क्रोधित होऊन काळयवनाकडे नेत्रकटाक्ष टाकला. एका क्षणात काळयवनाचे भस्म झाले.

तो गृहस्थ इक्ष्वाकुकुलातील मांधातापुत्र मुचुकुंद होता. तो सत्य-प्रतिज्ञ ईशभक्त असा महापुरुष होता. त्याने अनेकवार असुरांपासून इंद्रादी देव-देवतांचे रक्षण केले होते. नंतर देवांना सेनापती म्हणून कार्तिकेय लाभले. देव संतुष्ट होऊन कृतज्ञपणे मुचुकुंदाला म्हणाले, ''मोक्ष सोडून कोणतेही वरदान माग.'' सतत देवरक्षणार्थ जागृत राहून त्याला श्रम झाले होते. त्याने विश्रांतीसाठी निद्रेचे वरदान मागितले. देवांनी त्याला वरदान दिले, ''हे राजा, झोप घेत असताना जर कोणी तुला मधेच जागे केले, तर तो तुझ्या दृष्टीला पडताक्षणी भस्मीभूत होईल.'' भगवंतांनी मुचुकुंदाला जरासंध आणि काळयवनाची कथा विस्ताराने कथन केली.

काळयवनाचे भस्म झालेले पाहून मुचुकुंदाला परमानंद झाला. शिळेआडून भगवंत बाहेर आले. त्यांच्या चरणावर मुचुकुंदाने अतीव कृतज्ञतेने मस्तक ठेवले. ''प्रभो, आपण या भूलोकावरचे फार मोठे संकट निवारलेत. आमची आणखी एक इच्छा पूर्ण करावी, अशी विनंती आहे. या जन्मी आपले शुभदर्शन झाले. असेच दर्शन

आम्हांला पुढील जन्मीही लाभावे. भक्ताची एवढी इच्छा पूर्ण करावी.'' मुचुकुंद हात जोडून म्हणाला. भगवंत म्हणाले, 'तथास्तु.'

काही संवत्सरे सरली. दिंडीरवनात मुचुकुंद राजा जन्म घेता झाला. हे दिंडीरवन म्हणजेच आजचे भूवैकुंठ पंढरपूर आणि ज्या रूपात जन्म झाला, तो म्हणजे भक्त पुंडलीक. हा पुंडलीक मनाने खूप चांगला होता. आईवडिलांना मान देणारा, त्यांची आज्ञा पालन करणारा होता. पुढे तरुणपणी त्याचा विवाह एका अतिशय सुंदर तरुणीशी झाला. त्याची सुंदर बायको मात्र आपल्या सासू-सासऱ्यांचा विलक्षण द्वेष करत असे. पुंडलीक आपल्या लावण्यवती पत्नीचा दास झाला होता. तो आपल्या आईवडिलांची आज्ञा भंग करू लागला. त्यांना दुरुत्तरे करू लागला. त्यांचा अपमान करू लागला. इतकेच नाही तर प्रसंगी तो त्यांना मारहाणही करू लागला. पुंडलिकाच्या वृद्ध मातापित्यांना अतीव दुःख झाले. त्यांनी ईश्वराजवळ प्रार्थना केली, ''एक तर या पुंडलिकाचे वर्तन सुधारण्यासाठी त्याला प्रेरणा दे, नाहीतर आम्हांला तुझ्या चरणी बोलावून घे.''

एके रात्री झोपलेला असताना भगवंत पुंडलिकाच्या स्वप्नात आले आणि म्हणाले, ''अरे पुंडलीका, जन्मात एकदा काशीस जाऊन यावे.'' पुंडलीकाला खडबडून जाग आली. त्या दिवशी आपल्या लावण्यवती पत्नीला सांगून पुंडलीक काशीला निघाला. मजल-दरमजल करत पुंडलीक निघाला होता. सूर्य मावळला, अंधार पसरला. पुंडलीकही चालून चालून थकला होता. त्यालाही विश्रांतीची आवश्यकता होती. वाटेत कुक्कुट मुनींचा आश्रम लागला. पुंडलीक विश्रांतीसाठी आश्रमात गेला. मुनींनी त्याचे स्वागत केले. त्याला

जलाने भरलेले पात्र दिले. हस्तमुख प्रक्षाळण केल्यावर मुनींनी त्याला बसण्यास आसन दिले आणि थोडा वेळ थांबण्यास सांगितले. मुनी मोठे मातृ-पितृभक्त होते. त्यांचे मातापिता अतिशय वृद्ध होते. त्यांना त्यांनी आपल्या हाताने मोठ्या प्रेमाने घास भरवले. पाणी पाजले. आपल्या उपरण्याने त्यांचे मुख पुसले. नंतर ते या अतिथी म्हणून आलेल्या पुंडलिकासाठी भोजनपात्र घेऊन आले. पुंडलिकाचे भोजन झाले. मग मुनींनी स्वत: भोजन केले. नंतर त्या मुनींनी निद्रा लागेपर्यंत मातापित्यांचे चरण चेपले. चरण चेपता चेपता त्यांच्याशी मधुर भाषण केले. मातापित्यांना निद्रा लागल्यावर ते उठले. पुंडलीक निरीक्षण करत होता. कुक्कुट मुनींचे मातापित्यांवरील प्रेम बघत होता.

एवढ्यात त्या आश्रमात अत्यंत कुरूप अशा तीन स्त्रिया आल्या. आल्या आल्या त्यांनी कुक्कुट मुनींच्या चरणावर आपापली मस्तके ठेवली. मुनींनी त्यांना आशीर्वाद दिला. वंदन करून त्या परत उभ्या राहिल्या. त्यावेळी त्या कुरूप न राहता अतिशय सुंदर झाल्या. हा चमत्कार पाहून पुंडलीक आश्चर्यचकित झाला. त्याने त्या सुंदर झालेल्या स्त्रियांना विचारले, ''आपण कोण ? आलात त्यावेळी आपण कुरूप होता आणि आता सुंदर झाला. या साऱ्याचे रहस्य काय ?'' त्यातील एक स्त्री म्हणाली, ''मी गंगा, ही यमुना आणि ही सरस्वती. आम्ही तिघी सरिता आहोत. आमच्या जलात अनेक लोक आपली पापे धुतात. आम्ही कुरूप होतो, अपवित्र होतो. हे कुक्कुट मुनी मातृ-पितृभक्त आहेत. मातापित्यांची ते मनोभावे सेवा करतात. म्हणूनच ते परमपुण्यवान आहेत. त्यांच्या चरणांवर मस्तक

ठेवले, त्यांचे आशीर्वाद लाभले की आमच्या ठायी आलेली पापे नष्ट होतात. आम्ही परत सुंदर, पवित्र होतो.'' कुक्कुट मुनींना वंदन करून त्या तीन सरिता निघून गेल्या.

आश्रमात निद्रा घेत असताना पुंडलिकाला परत स्वप्न पडले. स्वप्नात काशीविश्वेश्वर आला. तो म्हणाला, ''पुंडलीका, मातापित्यांच्या सेवेतच भगवंत आहे.'' पुंडलीक जागा झाला. त्याला या साऱ्या गोष्टींचा उलगडा झाला. आपण सुंदर स्त्रीबरोबर विवाह झाल्यानंतर आईवडिलांचा आदर करेनासा झालो. त्यांचा अपमान केला. प्रसंगी त्यांच्यावर हातही उचलला. किती घोर पापी आहोत आपण. पुंडलीक पश्चात्ताप पावला. दुसऱ्या दिवशी सकाळी कुक्कुट मुनींच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याने त्यांचा निरोप घेतला. काशीला न जाता तो परत दिंडीरवनात आपल्या घरी आला. आल्या आल्या त्याने आईवडिलांचे चरण धरले. त्यांची क्षमा मागितली. त्याच्या पत्नीला हा बदल पाहून मोठे आश्चर्य वाटले. तिने पतीला एकांती याचे कारण विचारले. पुंडलिकाने कुक्कुट मुनींची मातृपितृसेवा, गंगा-यमुना-सरस्वती या सरितांचा प्रसंग आणि काशीविश्वेश्वराने दिलेला स्वप्नदृष्टांत कथन केला. सारे ऐकून तिलाही पश्चात्ताप झाला. तिने आपल्या सासू-सासऱ्यांची क्षमा मागितली. त्यानंतर पुंडलीक आपल्या मातापित्यांची मनोभावे सेवा करू लागला.

द्वारकेचा राजा श्रीकृष्ण. अंतर्ज्ञानाने त्याने पुंडलिकाला जाणले. हाच पूर्वजन्मीचा राजा मुचुकुंद. त्याला दिलेल्या वचनाचे स्मरण झाले. भक्तवत्सल श्रीकृष्ण दिंडीरवनात गेले. इकडे श्रीकृष्ण दिंडीर-वनाच्या मार्गावर असताना रुक्मिणी पतीचा शोध घेत घेत दिंडीरवनात

आली. चंद्रभागेच्या तीरावरील हा रमणीय प्रदेश. रुक्मिणी त्या वनात येऊन पोचली. श्रीकृष्ण पुंडलिकाच्या घरासमोर आला. पुंडलीक मातापित्यांचे चरण चेपत होता. त्याला भगवंतांची चाहूल लागली. तो बाहेर आला. बाजूला एक वीट होती. तीच त्याने भगवंताच्या चरणतली ठेवली. पुन्हा मातापित्यांच्या सेवेत मग्न झाला. भगवंत मोठ्या स्नेहभावाने पुंडलिकाची सेवा पाहू लागले.

थोड्या वेळानंतर पुंडलीक बाहेर आला. भगवंत कटेवर हात ठेवून विटेवर उभे होते. पुंडलिकाने भगवंतांच्या चरणांवर मस्तक ठेवले आणि हात जोडून तो म्हणाला, "हे सर्वेश्वरा, आपण असेच या ठिकाणी भक्तांना प्रेरणा देण्यासाठी, त्यांना आशीर्वाद देण्यासाठी, भक्तांवर कृपा करण्यासाठी उभे राहावे." भगवंत म्हणाले, 'तथास्तु !'

रुक्मिणी शोधत शोधत पुंडलिकाच्या घरासमोर आली. तर इथेही आपले पतिराज भक्ताची मातृ-पितृसेवा पाहण्यात मग्न. आपल्याकडे दुर्लक्षच ! रुक्मिणी रुसली आणि बाजूला जाऊन उभी राहिली.

* * *

दिंडीरवन म्हणजेच पंढरपूर. कटेवर हात ठेवून उभा आहे तो भक्तवत्सल 'श्रीकृष्ण-विठ्ठल-पांडुरंग.' युगे अठ्ठावीस भक्तांसाठी उभा आहे. हेच ते युगानुयुगे येणाऱ्या भक्त-पुंडलिकांसाठी उभे असलेले परब्रह्म. रुसून उभी असलेली रुक्मिणी. तिचे स्वतंत्र मंदिर.

संतश्रेष्ठ नामदेव, संत ज्ञानेश्वरांचे समकालीन. ज्ञानदेवांनी लहान

वयात समाधी घेतली. नामदेव ज्ञानदेवांपेक्षा वयाने ज्येष्ठ पण ज्ञानदेवांचे उत्तराधिकारी. त्यांचे परमपवित्र चरित्र आपण कथन करणार आहोत. ज्या विठ्ठलाशी नामदेवांची बालपणापासून गट्टी होती, त्या युगधारक पांडुरंगाची कथा समजून घेतली. आता अनुभवणार आहोत 'अमृताहुनी गोड नाम तुझे देवा' अशा मधुर रचना करणाऱ्या संताची अमृतमय कथा.



# २ - विठ्ठलमुखी नामयाचा घास

मराठवाड्यामधील जिल्हा परभणी. बारा ज्योतिर्लिंगातील एक ज्योतिर्लिंग याच जिल्ह्यात. 'औंढ्या नागनाथ', महादेवाचे पवित्र क्षेत्र. औंढ्या नागनाथापासून पाच कोसांवर नरसी नावाचे गाव. नरसीपासून पाच ते दहा कोसांवर ब्राह्मणी नावाचे गाव. दोन्ही गावांना मिळून नरसीबामणी म्हणत असत. या नरसी गावात यदुशेट रेळेकर नावाची व्यक्ती राहात असे. व्यवसाय कपडे शिवण्याचा म्हणजे शिंप्याचा. कपडे शिवण्यात तरबेज. कपडे शिवावेत, घोड्यावर लादावेत, गावोगाव फिरावे, बाजारी-घरोघरी द्यावेत. कोणी रुका तर कोणी धान्य देई, त्यावर प्रपंच चालवावा. या यदुशेटचा मुलगा हरिशेट, त्याचा मुलगा गोपाळशेट, त्याचा मुलगा गोविंदशेट. परंपरागत शिंप्याचा व्यवसाय. ईश्वरसाक्षीने तो करावा. प्रामाणिकपणाने करावा. आल्यागेल्याची विचारपूस करावी. दुपारी उन्हात आलेल्याला गूळपाणी द्यावे. कोणी भुकेला दारी आला, तर आपल्या घासातला घास द्यावा. आठवड्यातून एकदा तरी गोमातेला चारा घालावा.

सरळ सज्जन माणसांचे घराणे. तर या गोविंदशेटने नरसीबामणी गाव सोडले आणि त्याने आपला प्रपंच भूवैकुंठ मानल्या गेलेल्या पंढरपुरात थाटला. या गोविंदशेटचा मुलगा नरहरशेट आणि नरहरशेटचा मुलगा दामाशेटी.

या पंढरपुरात पांडुरंगाचे मोठे थोरले देऊळ. या देवळाच्या बाहेरच्या भिंतीवर एक शिलालेख आहे. याला चौऱ्यांशीचा शिलालेख असे म्हणतात. या शिलालेखात या विठ्ठलमंदिरासाठी ज्यांनी ज्यांनी दान दिले, त्यांची नावे कोरली आहेत. यात देवगिरीचा राजा यादव याचेही नाव आहे. भक्तवत्सल पांडुरंग कटेवर हात ठेवून विटेवर एका गाभाऱ्यात उभे आहेत. तर रुक्मिणीदेवी दुसऱ्या गाभाऱ्यात उभ्या ठाकल्या आहेत. बाहेर मोठा मंडप, ओवऱ्या. देवळाच्या सभोवताली मोठा दगडी तट. पहाटेच्या काकडआरतीपासून देवळात गजबज सुरू व्हायची. देवाचे मुखप्रक्षाळण, मग देवाचे स्नान-अभिषेक, नंतर नैवेद्य. दिवसभर या पांडुरंगदर्शनासाठी भक्तभाविकांची रीघ लागलेली असे. संध्याकाळी भजन-कीर्तन. रात्री आरती आणि प्रसाद. दामाशेटी हा या विठ्ठलाचा परमभक्त. रोज देवाला नैवेद्य दाखवल्याशिवाय ते घर जेवत नसे.

दामाशेटीचे लग्नाचे वय झाले. त्यांचा विवाह कल्याणच्या गोमाजीशेटांची कन्या गोणाईशी झाला. त्यांना आऊबाई म्हणून कन्या झाली. पण या दांपत्याला पुत्ररत्न हवे होते. गोणाईने विठ्ठलचरणी प्रार्थना केली. एक चांगला पुत्र देण्याची विनवणी केली. त्या भक्तवत्सलाने ती विनवणी ऐकली. पांडुरंगकृपेने रोहिणी नक्षत्र

पूर्व क्षितिजावर होते. कार्तिक शुद्ध एकादशी शके ११९२ रोजी गोणाईस पुत्ररत्न झाले. नाव ठेवले 'नामदेव'.

**माझें जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें । लिहिलें त्याची खूण सारू ऐका ।।**
**अधिक ब्याणव गणित अकराशतें । उगवतां आदित्य रोहिणीसीं ।।**
**शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रमोद संवत्सर शालिवाहन शके ।।**
**प्रसवली माता मज मळमूत्रीं । जेव्हां जिव्हेवरी लिहीलें देवें ।।**
**शत कोटी अभंग करील प्रतिज्ञा । नाम मंत्र खुणा वाचुनी पाहे ।।**
**ऐंशीं वर्षें आयुष्य पत्रिका प्रमाण । नामसंकीर्तने नामया वृद्धि ।।**

(संत नामदेवांचे आत्मनिवेदन - ९५)

आईबाबांच्या कडेवरून नामा देवळात जायचा. त्यांनी सांगितल्यावर इवलेसे हात जोडून बाप्पाला नमस्कार करायचा. विठ्ठलाच्या मूर्तीकडे तो टकाटका बघत राहायचा. आरतीला इवल्याशा हातांनी टाळ्या वाजवायचा. भजन, कीर्तन ऐकताना तल्लीन व्हायचा. बघता बघता तो रांगता, चालता, धावता झाला. इतर सवंगडी आटापाट्या, हुतूतू, विटीदांडू, सूरपारंब्या खेळत असत. त्यात त्यांना आनंद मिळत असे. पण नामा मात्र इतरांहून वेगळा. तो देवळातल्या, वाळवंटातल्या भजनात, कीर्तनात रंगून जायचा.

एक दिवस आऊताई आणि नामदेवासमवेत राहायला आणखी एक भगिनी आली, जनाबाई. मराठवाड्यातील परभणी जिल्हा. त्या जिल्ह्यातील गंगाखेड गावात दमा म्हणून एक जातीने शूद्र गणला गेलेला विठ्ठलभक्त होता. त्याच्या पत्नीचे नाव करुंड. या दोघांचीही पंढरीची वारी चुकली नाही. त्यांचा संसार सुखात सुरू होता. एकच

दु:ख म्हणजे त्यांना अपत्य नव्हते. त्यांनी पांडुरंगाची करुणा भाकली. एके रात्री गाढ निद्रेत असताना दमाच्या स्वप्नी साक्षात पांडुरंग आला. दमाने भक्तिभावाने त्याच्या चरणी आपला माथा ठेवला. या दर्शनाने त्याच्या नेत्री आनंदाश्रू दाटले. पांडुरंग म्हणाला, ''तुला एक कन्या होईल. तिचे नाव तू जना ठेव. तीसुद्धा माझी परमभक्त असेल. पण तू तिला तुझ्या घरी ठेवू नकोस. पंढरपुरात दामाशेटी म्हणून एक सज्जन आणि भाविक गृहस्थ आहेत. त्यांना ती मुलगी अर्पण कर. तुझ्या कुळाचा उद्धार होईल.'' दमाने पुन्हा पांडुरंगचरणी मस्तक ठेवले आणि वचन दिले, ''देवा, पांडुरंगा, तुम्ही सांगितले तसेच होईल.'' देव अंतर्धान पावला आणि दमाला जाग आली. आपली पत्नी करुंड हिला दमाने स्वप्नदृष्टांत सांगितला. विठ्ठलकृपेने करुंडला दिवस गेले. यथावकाश ती प्रसूत झाली. कन्या झाली. तिचे नामकरण केले, 'जनाबाई.' जना सहाएक वर्षांची झाली. करुंडच्या छातीवर दगड ठेवल्यासारखे झाले. इतकी गोड पोर. दुसऱ्याला द्यायची. नवऱ्याजवळ याविषयी ती डोळ्यांत पाणी आणून म्हणत असे, ''ऐकलं का, हा काळजाचा तुकडा परस्वाधीन करायचा म्हणजे....'' पुढं बोलूच शकत नसे. यावर दमा म्हणे, ''ही पोर जितकी आपली तितकीच त्या विठू माउलीची. त्या माउलीची आपण सारी लेकरं. तिलाच आपली आणि आपल्या लेकीची चिंता. आपण तिच्या आज्ञेनुसार वागायचं !''

सहा वर्षांच्या जनाबाईला घेऊन दमा आणि करुंड दामाशेटीकडे आले. दामाशेटींनी त्या अतिथींचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. हातपाय धुवायला पाणी दिले. बसायला घोंगडे अंथरले. फुलपात्रांमधून

दूध दिले. दमाने आपली आणि करुंडची ओळख करून दिली. जनाविषयीचा स्वप्नदृष्टांत सांगितला. ''तसा मी खाऊन पिऊन सुखी आहे. जनाची आई येतानाच किती रडली काय सांगू. पण माझ्या पांडुरंगाला मी वचन दिलंय. तुम्हीही विठ्ठलभक्त आहात, असं ती माउली म्हणाली. या पोरीनं लळा तर इतका लावलाय की काय सांगू ! पण....'' दमा रडू लागला, करुंडही रडू लागली. दामाशेटी आणि गोणाई दोघांचे सांत्वन करू लागले. दामाशेटी म्हणाले, ''माझी आऊ, नामा तशीच जना. साक्षात विठ्ठलानंच दृष्टांत दिला आहे. आजपासून ही मुलगी माझी मुलगी झाली. विठ्ठलाच्या कृपेनं काही भव्य-पवित्र घडायचा हा संकेत आहे. तो द्यायला पुढं झाला आहे. आपण स्वीकारायला हवं.'' गोणाईने जनाला प्रेमाने जवळ घेतले, ''माझी जनाबाई गं ती !'' एवढ्यात आऊताई आणि नामा तिला खेळायला बोलावून घेऊन गेले. जणू काही त्यांचे जन्मजन्मांतरीचे नाते होते. या नात्याविषयी जनाबाईच एका अभंगात सांगतात.

**ऐका हो नामयाचा जन्म मूळसंचित ।।धृ.।।**
**हिरण्यकश्यपकुळी नामा प्ऱ्हाद । पद्मिनी नाम माझे श्रेष्ठ दासीचें पद ।।**
**दुसरा जन्म याचा अंगद रामभक्त । मंथरा नाम माझे भरतें मारिली लात ।।**
**द्वापारीं कृष्णसेवा उद्धव जन्मला । कुबज्या नाम माझें देवें उद्धार केला ।।**
**कलीत नामदेव विठ्ठल चिंतनी । त्याचीच सेवेलागी दासी जन्मली जनी ।।**

(संत जनाबाई - १३१)

दमा आणि करुंड दामाशेटी आणि गोणाईचा पाहुणचार घेऊन निघून गेले. जना दामाशेटींच्या घरचीच झाली.

दुपारी जेवणाआधी पांडुरंगाच्या देवळात जावे. देवाला घरातल्या लक्ष्मीने रांधलेल्या भोजनाचा नैवेद्य दाखवावा, नंतरच आपल्या मुखी घास घ्यावा ही दामाशेटीच्या घरची प्रथा. एक दिवस दामाशेटी व्यवसायानिमित्त दूरच्या गावी जाणार होते. त्यांनी गोणाईला तशी कल्पनाही दिली होती. दुपारच्या वेळी गोणाईचा स्वयंपाक झाला. नेहमीप्रमाणे तिने नैवेद्याचे ताट तयार केले. त्यावर पत्रावळ झाकली. तिने नामाला हाक मारली, ''नामा, आज तू नैवेद्य दाखवून ये बाबा.'' नामदेवाने ताट हाती घेतले. नामदेव ताट हाती घेऊन निघाले. ''सांभाळून रे बाबा, सांडू नकोस.'' गोणाई म्हणाली.

नामदेव देवळाच्या गाभाऱ्यात आला. विठ्ठलमूर्तीसमोर चौकोनी पाषाण होता. जवळ असलेल्या पाण्याच्या भांड्यामधून त्याने पाणी घेतले. त्या पाषाणावर मंडल रेखले. त्यावर नैवेद्याचे ताट ठेवले. वरची पत्रावळ दूर केली. दोनदा त्या ताटाभोवताली पाणी फिरवले आणि म्हणाले, ''या देवा, घ्या जेवण.'' देव मात्र तसाच उभा. नामा पुन्हा म्हणाला, ''देवा, आमचीही जेवणाची वेळ झाली आहे आणि तुमचीही जेवायची वेळ आहेच की. देवा, मी रोज स्वच्छ अंघोळ करतो. आजही स्वच्छ अंघोळ केली आहे. धोतर, बंडी स्वच्छ धुतलेली आहे. या देवा, वेळ घालवू नका.'' नामाने हात जोडले. देव आपल्या जागीच. ''देवा, तुम्ही नैवेद्य खाल्ल्याशिवाय आमच्या घरात कोणी जेवणार नाही. घरी आई, आऊताई, जनाबाई कोणी जेवलेलं नाही. मलाही भूक लागलीय, या लवकर, पटकन जेवून घ्या.'' देव काही खाली येईल अशी चिन्हे दिसेनात. शेवटी नामा निग्रहाने म्हणाला, ''देवा, आता जर तुम्ही जेवला नाहीत तर मी

माझं डोकं या पाषाणावर आपटीन.'' नामदेव त्याचे मस्तक आपटण्यासाठी वाकला मात्र, विठ्ठलमूर्ती देहरूपात प्रकट झाली. ''थांब नामा. अरे, तुझ्या प्रेमानेच मी खरा तृप्त झालो आहे. हे बघ मी नैवेद्य घेतला.'' देव जेवू लागले. नामाला महदानंद झाला. तो म्हणाला, ''देवा, सगळं संपवायचं हं. निपटी-शिपटी करा. ताटात काही टाकायचं नाही. आई म्हणते, ताटात टाकलं की अन्नपूर्णा रुसते.'' एवढ्याशा नामाचे बोलणे ऐकून विठ्ठलाला मोठे कौतुक वाटले. त्यानेही ताट स्वच्छ केले. नामाच्या भाषेत निपटी-शिपटी केली. ''देवा, तुमचं पोट भरलं का आणखी आणू ? धावत जाऊन आणतो.'' विठ्ठल म्हणाला, ''नको नामा, आज मी तृप्त झालो आहे. भोजनानं आणि त्याहून तुझ्या निष्पाप भक्तीनं.'' देव पुन्हा आपल्या जागी जाऊन उभे राहिले.

नामा रिकामे ताट घेऊन घरी आला. नामाला इतका उशीर का झाला म्हणून गोणाई चिंतेत होती. ''नामा, इतका का रे उशीर ?'' रिकामे ताट आईच्या हाती देत नामा म्हणाला, ''काय सांगू आई, देव लवकर जेवण करेनाच. शेवटी मी त्याला धमकावलं, आता जर तू जेवला नाहीस, तर या शिळेवर डोकं आपटून मी माझे प्राण देईन. मग कुठं देव खाली आला आणि जेवला.'' गोणाई मोठे मोठे डोळे करून नामाकडे बघत राहिली. ''देव जेवला ?'' ''देवानं हा सगळा नैवेद्य खाल्ला ?'' नामा म्हणाला, ''आई, मी देवाला निपटी-शिपटी करायला सांगितलं. आई म्हणते की, ताटात टाकलं की अन्नपूर्णा रुसते. देवानंही माझं ऐकलं.''

गोणाईने नामा, आऊ आणि जनाला वाढले. गोणाईचे नामाकडे

बारीक लक्ष होते. नामा नेहमीप्रमाणे व्यवस्थित जेवला. दिवसभरात तिने नामाला तीनचार वेळा विचारले. 'देव जेवला', हे नामाचे उत्तर. या उत्तराने तिचे समाधान होईना. रात्री खूप उशिरा दामाशेटी आले. दामाशेटी आणि नंतर गोणाईचे जेवण झाले. मुले आधीच जेवून झोपली होती. गोणाईने दामाशेटींना घडलेला प्रसंग सांगितला. दामाशेटी म्हणाले, "आपला नामा तसा खोटं बोलत नाही. आपण असं करू, उद्या मी मुद्दाम बाहेर जाईन. उद्याही नैवेद्य घेऊन नामालाच पाठवा. मी लपून राहून पाहीन." दुसऱ्या दिवशी नैवेद्य पाठवण्याच्या थोडा वेळ आधी काही कामाचे निमित्त करून दामाशेटी घराबाहेर पडले. ठरल्याप्रमाणे गोणाईने नामाला नैवेद्य घेऊन पाठवले. नामा देवळात शिरलेला पाहून त्याच्या नकळत दामाशेटी त्याच्या मागून गेले. एका खांबाआड उभे राहिले. नामाने विठ्ठलाला परत नैवेद्य दाखवला. विठ्ठलाला साद घातली. यावेळी मात्र विठ्ठल लगेच आला. विठ्ठलाने नैवेद्याचे ताट स्वच्छ केले. नंतर विठ्ठल नामाला म्हणाला, "नामा, रोज मला साद घालू नकोस बरं. तुझी आर्त हाक आणि खरा भक्तीचा भाव जाणून मी अन्न भक्षण केले. अन्नापेक्षा मी तुझ्या भक्तिभावाने खरा तृप्त झालो आहे. यापुढं तू फक्त नैवेद्य दाखव. तो मला पोचेल. प्रत्यक्ष खाण्याचा आग्रह करू नकोस. ऐकशील ना माझं ?" नामाने होकारार्थी मान डोलावली. रिकामे ताट घेऊन नामा गाभाऱ्याबाहेर आला. दामाशेटींनी नामाला घट्ट मिठी मारली. त्यांच्या नेत्रांमधून आनंदाश्रू वाहू लागले. "नामा, आज मी धन्य झालो. तुझा नैवेद्य पांडुरंगानं, साक्षात भगवंतानं घेतला. मी तुझा पिता आहे. खरोखर माझं भाग्य थोर आहे."



# ३ - विठ्ठलभक्त नामा आणि जना

**केशवा माधवा गोविंदा गोपाळा । जेवीं तूं कृपाळा पांडुरंगा**
**अच्युता वामना दशरथनंदना । जेवीं तूं बा कृष्णा पांडुरंगा**
**कृष्णा विष्णु हरी मधुसूदन मुरारी । जेवीं तूं नरहरी पांडुरंगा**
**ऐसी ग्लानि करितां विठ्ठल पावला । नैवेद्य जेविला नामयाचा**

(संत नामदेवांचे आत्मनिवेदन - १०२)

साक्षात विठ्ठलाने नामदेवाचा नैवेद्य ग्रहण केला. एकदा नाही दोनदा. तो नामाबरोबर बोलायचा. नामाला भगवंताशी बोलायला आवडायचे. घरात जना होती. तीही देववेडी. जना आणि नामाचा संवाद देवाविषयीच. नामा वयाने लहान खरा पण आवाज मोठा खडा. वारकरी संप्रदायातील पारंपारिक ओव्या-अभंग ऐकून ऐकून पाठ झालेले. भक्तिभाव मनातून भरून वाहणारा. गोणाई नामाजनाला चक्क पाठशाळेत हाकलत असे. पाठशाळेतही नामा आपले 'विठ्ठल-विठ्ठल-पांडुरंग !' करू लागत. पंतोजी धावून येत. कित्ता गिरवायला किंवा अंक लिहायला सांगितलेले असत. ते सोडून 'विठ्ठल-विठ्ठल-पांडुरंग !' रागारागाने ते नामाला जवळ बोलावून घेत. कित्ता बरोबर असे. अंक घडाघडा म्हणे. पंतोजींना काय करावे कळत नसे. एके दिवशी बाजार वाटेवर त्यांना नामाचे वडील दामाशेटी भेटले. ''मुलगा विठ्ठलवेडा झालाय. प्रपंच, व्यापार अशा कामी यायचा नाही, असे दिसते,'' पंतोजी म्हणाले. दामाशेटींचा चेहरा गंभीर झाला. ''अभ्यास करत नाही का ? कच्चा वाटतो का ?'' पंतोजी पटकन उत्तरले, ''छे, छे ! अभ्यास सांगेल तो तयार, पण मुखात

सतत 'विठ्ठल-विठ्ठल-पांडुरंग !' त्याच्यामुळं इतर मुलंही तसंच म्हणतात.'' यावर दामाशेटी काय बोलणार. ''सांगतो हो त्याला'', असे म्हणाले झाले.

दामाशेटी गोणाईला म्हणाले, ''अहो, आपला नामा फारच वेगळा आहे. पंतोजी सांगत होते की, तो तर विठ्ठलवेडा आहेच. सगळ्या पाठशाळेतल्या मुलांना त्यानं ते वेड लावलं आहे.'' गोणाई म्हणाली, ''आपण व्यापारासाठी बाहेर जाता. हा पोर जेवायलाही वेळेवर येत नाही. कधी देवळात तर कधी वाळवंटात. सारखं आपलं 'विठ्ठल विठ्ठल'. आत्ता तरी तो घरात कुठं आहे ! त्या जनाला पाठवलंय त्याला शोधायला. सारंच वेगळं. ती जनाही सारखं 'विठ्ठल विठ्ठल' हा नामाही सारखं 'विठ्ठल - विठ्ठल.' या विठ्ठलानं आपली ही दोन्ही पोरं बघा आपली ठेवलीच नाहीत. त्यानं दोघांनाही आपल्याच नादी लावलं. उभं आयुष्य आहे अजून. देवाचं आहेच की. आपणही देवपूजा, नामस्मरण करताच की. पण घर, शाळा, अभ्यास सोडून ? मला तरी बाई आता भीती वाटतीय,'' गोणाईने डोळ्यांना पदर लावला. ''नामाला रागवावंसं वाटतं. पण काय म्हणून रागवायचं ? त्याला अभ्यासाचं म्हणावं तर पंतोजी म्हणतात, 'येतं सारं त्याला.' बरं तशी वाईट संगती म्हणावी तर तीही नाही. मुखी विठ्ठलाचं नाम आहे, यासाठी त्याला रागवावं ? आपला नामा ही त्याचीच कृपा आहे,'' दामाशेटी समजुतीच्या स्वरात म्हणाले. गोणाई म्हणाली, ''त्याचीच कृपा खरी, तो त्याला आपल्याकडंच ओढून घेतोय.'' नामा विठ्ठलभक्तीत रमलेला, प्रवचन कीर्तनाची मनस्वी ओढ असलेला. आजूबाजूच्या गावातली माणसे त्याला

खास बोलावून न्यायची. कीर्तनात रंगणारे हे बालरूप त्यांना खूप आवडायचे. कधीकधी एकेक, दोनदोन दिवस नामा घरीच यायचा नाही. कोणी गावकरी येऊन सांगायचा, ''नामाची आई, नामा बाबूबरोबर मंगळवेढ्याला गेलाय. यील उद्या-परवा.'' गोणाई यावर काय बोलणार ! गप्प बसायची.

इकडे जनाबाई नामदेवाला शोधायला गेली. मंदिरातील गरुडमंडपात आली. कोणी एक मूर्तीच्या चरणांवर मस्तक ठेवत होता. पाठमोरा होता. अंगावरची वस्त्रे, डोक्यावरची कुंची आणि अंगलट तशीच होती. 'नामदेवा,' जनाने साद घातली. त्या माणसाने वळून मागे पाहिले. तो नामा नव्हताच. त्याने जनाला विचारले, ''ताई, तुम्हांला कोण हवंय ?'' जना म्हणाली, ''दामाशेटींच्या नामदेवाला मी शोधतेय.'' ''त्याला तर मी थोड्या वेळापूर्वी रुक्मिणीमंडपात पाहिलं.'' ती व्यक्ती म्हणाली. जना धावत धावत रुक्मिणीमंडपात आली. तर तिथेही मंदिरातीलच व्यक्ती. जना त्या व्यक्तीच्या मुखाकडे पाहातच राहिली. कधी त्याचे मुख नामदेवासारखे दिसे, तर कधी विठ्ठलासारखे. कधी दोघांहून निराळे. जनीच्या मुखावरील भाव पाहून ती व्यक्ती हसत हसत म्हणाली, ''आत्ताच त्याला मी पुंडलिकाच्या मंदिराकडे जाताना पाहिले.'' जना परत धावत पुंडलीक मंदिरात आली, तर तिथेही तीच व्यक्ती. ती व्यक्ती मोठ्यांदा हसत सुटली आणि म्हणाली, ''बघ नामा कसा आहे, आत्ता आत्ता इथं होता. बघता बघता गोपाळपुरी गेला की !'' जना बिचारी परत धावली गोपाळपुराकडे. तर गोपाळपुरात परत तीच व्यक्ती. म्हणते कशी, ''जने, तुझा नामा विष्णुपदी गेला बघ परत.'' जना विष्णुपदाकडे

गेली. तिथेही तीच व्यक्ती हसत उभी. आता मात्र जना चिडली. डोळ्यांतून आणि तिच्या थरथरणाऱ्या तनूमधून राग व्यक्त होत होता. धावून धावून श्वासोच्छ्वास जोरजोरात धपापत होता. तिने रागारागाने कमेरवर हात ठेवले. तेवढ्यात ती व्यक्ती विष्णुपदात विलीन झाली. जनाला मोठा राग आला. ती तरातरा पांडुरंगाच्या मंदिरात आली. तिने त्या कटेवरी हात ठेवून विटेवरी उभ्या असलेल्या पांडुरंगाकडे मोठा जळजळीत कटाक्ष टाकला आणि तावातावाने बोलू लागली, ''तू कसला रे देव, तू तर पक्का स्वार्थी आहेस. किती पायपीट करवलीस मला. घामाघूम झाले बघ. अरे त्या नामाची घरी सारीजणं वाट पाहताहेत. आई, वडील, आऊताई. भक्तावर देवानं प्रेम जरूर करावं. पण त्याच्या आईवडिलांपासून, भावाबहिणींपासून आप्तांपासून ओढून नेऊ नये. त्यांना त्या गोष्टीचं खूप दुःख होतं. पण तुला ती काळजी कसली ! भक्तलालसेने तू आंधळा झाला आहेस. म्हणून तू त्याला लपवतो आहेस. घरच्या आप्तमंडळींना तू दुःख आणि क्लेश देतो आहेस. तू घातकी आहेस !'' जना रागारागाने बोलत होती. बोलता बोलता ती एकदम थांबली. तिला त्या कटेवर हात ठेवून विटेवर उभ्या असलेल्याचे मुख नामदेवाचे दिसले. दिसतच राहिले. मग मात्र ती भानावर आली. तिचा राग ओसरला. आपण देवाला नावं ठेवली, दूषणे दिली. आपली फार मोठी चूक झाली. तिच्या नेत्रांमधून झराझरा अश्रू गळू लागले. मुख अभंग गाऊ लागले.

**नामयाचें ठेवणें जनीस लाधलें । धन सांपडलें विटेवरी**
**धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा**

**कामधाम माझे विठोबाचे पाय । दिवस निशीं पाहे हारपली**
**माझ्या वडिलांचें दैवत तो हा पंढरिनाथ । तेणें माझा अर्थ पुरविला**
**संसारीचें सुख नेघे माझे चित्तीं । तरीच पुनरावृत्ती चुकविल्या**
**नामयाचे जनी आनंद पैं झाला । हृदयीं बिंबला पांडुरंग**

(संत जनाबाईंचे अभंग - २२५)

गाता गाता भावनावेगात ती कोसळणार, तोच नामदेवाने तिला सावरले. नामा देवाकडे पाहून म्हणाले, ''विठ्ठला, जनाबाई किती दमली आहे बघ. का रे तिला इतकं छळलंस ?'' त्याच्या प्रश्नावर विठ्ठल प्रसन्न हसले. ''आणखी वर हसतोस ? तू मोठा मायावी आहेस. अगं जना, मी इथंच होतो. यानं मात्र तुला खूप पायपीट करायला लावली. मोठा छळवादी आहे हा. चल, मीच आज तुझे पाय चेपीन, तेल लावीन या पायांना. यानं तुला छळलं. आता याचं नावसुद्धा नको.'' जना भानावर आली होती. ती म्हणाली, ''अरे नामा, याच्या मुखाकडं तरी बघ, किती प्रसन्न आहे. त्याच्याच रूपात तू मला दिसलास. मला यानं धावायला लावलं खरं, पण मला यानं आज दर्शन दिलं. आज मी पूर्ण समाधानी झाले बघ.'' नामदेवाचे कर त्या प्रसन्नमुख विठ्ठलाला आपोआप जोडले गेले. तो गाऊ लागला.

**विठ्ठलासी पाहे विठ्ठलासी ध्याये । विठ्ठलासि गाये सर्वकाळ**
**विठ्ठल हा वृत्ति विठ्ठल जपणें । चित्त वित्त मनें सर्वकाळ**
**सबाह्य विठ्ठल दाटे घनवाट । दशदिशा अफाट विठ्ठलचि**
**नामा म्हणे तुम्ही विठ्ठल होऊन । अभंग भजन करीतसां**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २२८४)

विठ्ठल प्रसन्न झाले. गाभाऱ्यात आवाज घुमला, "नामदेवा, ही जनाबाई माझी परमभक्त आहे. ती माझ्यावर प्रेम करते. रागावली होती खरी, पण खरं प्रेम करणाऱ्यालाच रागावण्याचा अधिकार असतो बरं ! अरे नामा, प्रेम, राग या मानवी जन्मातल्या नित्य भावना आहेत. या दोन्ही भावना तशा निर्मळच. पण यात ते द्वैत सतत विष कालवत असतं बघ. उच्चनीच जात, गरीब-श्रीमंत स्थिती अशा गोष्टी परस्परांमधलं प्रेम कमी करून त्या जागी सूड, वैर निर्माण करतात. मग मानवाचा दानव होण्यास वेळ लागत नाही. मानवलोकाचं रूपांतर दानवलोकात होऊ नये, यासाठी उत्तम असणारा भक्तिमार्ग. प्रथम हा मार्ग मानवाला मानवच ठेवतो. नंतर तो त्याला मुमुक्षु बनवतो आणि त्याच साधनामार्गानं तो माझ्यात विलीन होतो. याच मार्गाचा तुम्ही दोघांनी आचार आणि प्रसार करायचा आहे. नामदेवा, ही जना कोण आहे, तुला ठाऊक आहे ना ?"

नामदेवाच्या आणि जनाबाईच्या नेत्रांमधून आनंदाश्रू गळत होते. नामदेव हात जोडून म्हणाला, "विठ्ठला, पांडुरंगा, ही जना साक्षात जगज्जननी आहे. माझी सावली आहे. जशी आऊताई तशीच जना. देवा आज तू आम्हा दोघांशी बोललास. आम्हांला सन्मार्गात करण्याच्या सत्कार्याची प्रेरणा दिलीस. खरंच देवा, आमचा जन्म धन्य झाला."

**सार पैं नाम विठ्ठलाचें आहे । दिननिशीं सोय मना लावीं**
**गुंपेजेल मन जोडती पाउलें । तुटती घेतले मायाजाळ**
**नामचि कारण जप पैं सकळ । उद्धार निर्मळ सकळ जीवां**
**नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरिये । नाम अमृतमय चराचरीं**

(संत नामदेवांची अभंग गाथा - २२८५)

नामा तर गायब होतोच. कधी दोन प्रहर तर कधी दोन दिवस. आज या जनाला शोधायला पाठवले तर तिलाही इतका उशीर ! वाट पाहून दामाशेटी मंदिरात नैवेद्याचे ताट घेऊन निघाले होते. ते जाताना म्हणाले, ''अरे, किती उशीर ? जेवणवेळ टळायची वेळ आली.'' नामाने आणि जनाने हातपाय धुतले. आऊताई आणि गोणाई पाने घेत होती. गोणाई खूप चिडली होती. पण काय कोणास ठाऊक, नामा आणि जनाला पाहिल्यावर तिच्या तोंडून कठोर शब्दच निघेनात. शेवटी तिने जनाला विचारले, ''नामा एक असा. पण तू का गं इतका उशीर केलास ?'' जनाने आपण नामाला कुठे कुठे आणि कसे कसे शोधले ते सांगितले. मग मात्र गोणाईला राग आला. ती नामाला म्हणाली, ''माझ्या जनीला इतका त्रास दिलास ? तिला तू अशी पायपीट का करायला लावलीस ?''

नामा म्हणाला, ''अगं आई, मी मंदिरातच होतो. ही सारी त्या विठ्ठलाची लीला. मला कोणता अनुभव आला सांगू ? मी मंदिरात गेलो. नेहमीप्रमाणं नमस्कार केला. विठ्ठल मला म्हणाला, ''नामा, चल. आपण गाई घेऊन जाऊ या. मी आणि विठ्ठल वाळवंटात आलो. तिथं खूप गाई होत्या. आणि आश्चर्य असं; वाळवंटाचं वन झालं, चंद्रभागेची यमुना झाली. विठ्ठल गोकुळातला गोपाळ आणि मी पेंद्या. यमुनाकाठी शेत होतं. पिकाला सुंदर कणसं आली होती. त्या कणसाच्या मोहानं गाई उधळल्या. कुंपण तोडून शेतात घुसल्या. आई, सगळ्याच गाई अशा खोडकर नव्हत्या. काही गाई वनातल्या मोकळ्या ठिकाणी उगवलेला चारा खात होत्या. मग मी लंगडत

लंगडत शेताजवळ गेलो. गाईंना प्रेमानं साद घातली. गोपाळकृष्णाची शपथ घातली. गोपाळकृष्णांच्या ताब्यात त्या गाई दिल्या. गोपाळकृष्ण प्रसन्न होऊन म्हणाले, 'पेंद्या, या षड्रिपूंच्या गाई बरं !' मग मी जागा झालो. बघतो तर मी मंदिरातच आहे. आणि ही जना दमून कोसळायच्या बेतात होती. मीच तिला सावरलं.'' नंतर जनाने विठ्ठलदर्शन कसे झाले ते सांगितले. देवाने केलेला उपदेश सांगितला.

नामा आणि जना आपली अनुभूती सांगत असताना दामाशेटी नैवेद्य दाखवून परत आले होते. जना आणि नामाची अनुभूती ऐकून मातापिता आणि आऊताई तिघेही गहिवरून गेली. जेवणाची तयारी झाली होती. सर्वजण भोजनमंत्र म्हणून जेवायला बसले. नामा एकेक घास घेत होता. मन मात्र विठ्ठलाचा आठव करून त्यालाच गात होते.

**तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा । पाजीं प्रेमपान्हा पांडुरंगे**
**तूं माझी माउली मी तुझें वासरूं । नको पान्हा चोरूं पांडुरंगे**
**तू माझी हरिणी मी तुझें पाडस । तोडीं भवपाश पांडुरंगे**
**तू माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घालीं मज पांडुरंगे**
**कासवीची दृष्टी सदा बाळावरी । तैसा दया करी पांडुरंगे**
**नामा म्हणे होसी भक्ताचा वल्लभ । मागें पुढें उभा सांभाळिसी**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १६१०)



# ४ - अलौकिक नामा

उठा पांडुरंगा आतां दर्शन द्या सकळां । झाला अरुणोदय सरली निद्रेची वेळा ।।
संत साधु मुनि अवघे झालेती गोळा । सोडा शेजे सुख आतां पाहूं द्या मुखकमळा ।।
रंगमंडपी महाद्वारीं झालीसे दाटी । मन उतावेळ रूप पहावया दृष्टी ।।
राही रखुमाबाई तुम्हां येऊं द्या दया । शेजे हालउनी जागें करा देवराया ।।
गरुड हनुमंत उभे पहाती वाट । स्वर्गींचे सुरवर येऊनी आले बोभाट ।।
झालें मुक्तद्वार लाभ झाला रोकडा । विष्णुदास नामा उभा घेऊनि काकडा ।।

(संत नामदेवांची अभंगगाथा - २९)

नामदेवांनी काकडा गायला. उपस्थित मंडळी काकडारती झाल्यावर निघून गेली. प्रात:कालच्या पूजा-आरतीला अजून अवधी होता. मंदिराच्या गाभाऱ्यात आता फक्त नामा आणि विठ्ठल असे दोघेच उरले. नामदेवांनी विठ्ठलचरणी डोई ठेवली आणि त्यांनी विचारले, ‘‘भगवंता, माझी आई माझ्याही आधी, इतक्या लवकर तुझ्या दर्शनासाठी आली. बहुधा पहाटवेळेआधीच आली असावी. आईला तुझ्या भक्तीची इतकी ओढ आहे हे मला ठाऊक नव्हतं. मी आत येतो आहे असं पाहून ती माझ्याकडं पाहूनही न पाहिल्यासारखी निघून गेली. माझ्याशी बोललीही नाही.’’ विठ्ठल स्मितहास्य करत म्हणाले, ‘‘नामा, तुझे मातापिता माझेच भक्त आहेत. पण आज मात्र तुझी माता माझ्या भक्तीच्या ओढीनं आली नव्हती. आज ती माझ्यावर विलक्षण रागावली होती. काय म्हणाली ठाऊक आहे, ‘देवा, पांडुरंगा, मोठा स्वार्थी आहेस तू. आमचा नामा ही तुझीच कृपा आहे. उद्या आऊ जाईल सासरी नांदायला. मग आम्हांला

नामाच. तो नामाच आमच्यापासून दूर ओढला जातोय. तो तुझ्याकडं ओढला गेला आहे. त्यानं वाडवडिलांचा धंदा करावा. प्रपंच करावा, अशी आम्हा दोघांची इच्छा आहे.  आम्हांला तूच दिलेला पुत्र तूच परत तुझ्याकडं ओढून नेतो आहेस, हे काही बरं नव्हे. तो नसताच तर वेगळी गोष्ट ! पण त्याच्यावर आमचा जीव आहे. त्याचे वडील खूप चिंतेत असतात. व्यवसायात नामा उभा  राहिलेला त्यांना पाहायचा आहे. खरं तर ते त्यांचं स्वप्नच आहे. एकमेव स्वप्न ! माझ्या मनाची स्थिती तुला काय सांगू ? मी आई आहे त्याची. माझा पोर माझ्यापासून दुरावला, निव्वळ तुझ्यामुळं, इतकंच मला ठाऊक आहे. आम्हा मातापित्यांना दु:ख देऊन तुला आनंद मिळवायचा आहे. मिळव तू ! भक्तवत्सल म्हणून आणखी कीर्ती मिळवशील !' नामा, तुझ्यामुळं हे सारं मला ऐकून घ्यावं लागलं.''

नामदेवाला बराच वेळ काय बोलावे हे सुचेना. शेवटी तो म्हणाला, ''देवा,  माझे मातापिता म्हणतात ते त्यांच्या दृष्टिकोनामधून बरोबर वाटतं. प्रपंच आणि लोकव्यवहार सांभाळण्यासाठी व्यवसाय, चाकरी वगैरे गोष्टी आवश्यक आहेतच. पण देवा, मला ते सारं करावंसंच वाटत नाही. तुझं नामस्मरण करावं, तुझ्या कीर्तनात रंगून जावं असं वाटतं. यातच सार असं वाटतं. यातच मी तृप्त होऊन जातो.'' यावर पांडुरंग  म्हणाले, ''नामा, तुझं मन मला कळतं रे. पण आईवडिलांप्रति तुझं काही कर्तव्य नाही का ? त्यांचं मन मोडणं बरं आहे का ? तुझ्याविषयी त्यांच्या मनातही काही इच्छा-आकांक्षा असतील. तू प्रपंच करावास अशी तुझ्या आईची इच्छा आहे. तू वंशपरंपरागत व्यवसाय करावास अशी तुझ्या वडिलांची मनीषा

आहे. हे सारं करून, प्रपंचाची कर्तव्यं पूर्ण करून तू माझी भक्ती करावीस, अशी त्यांची मनोभूमिका आहे.'' नामदेवांनी विठ्ठलासमोर होकारार्थी मान डोलावली, पण मन मात्र म्हणत होते,

**घालीन लोटांगण । वंदिन चरण।**
**डोळ्यांनी पाहीन । रूप तुझें॥**
**प्रेमें आलिंगीन । आनंदें पूजिन।**
**भावें ओवाळीन । म्हणे नामा॥**

ओवाळणी म्हणून नामा घरी निघाला. त्याचा स्वत:शी संवाद सुरू झाला. 'आई-बाबांचं तरी काय चूक आहे ? मी प्रपंच करावा, घरचा परंपरागत व्यवसाय करावा. बाबा वयानं थकत चालले आहेत. धन आपल्या पुत्रानं मिळवून आणावं, आपल्यावरचा प्रपंचाचा भार त्यानं वाहावा अशीच त्यांची इच्छा असणार. मला मात्र त्या विठ्ठलाशिवाय काही सुचत नाही. त्याचंच रूपडं माझ्या मनी ठसलं आहे. आज त्यालाच बोल लावला माझ्या मातेनं. त्यानं आपल्याला जन्मातल्या प्रपंचकर्तव्याची जाणीव करून दिली. ते कर्तव्य आपण करायला हवं. आपण जर ते केलं नाही, तर आई विठ्ठलाला दोष देते. आपल्यामुळं भगवंताला रागावून घ्यावं लागतं. पण आपल्याला हे कर्तव्य करता येईल का ? पांडुरंगाच्या स्मरणात व्यत्यय येईल. आपलं मन गप्प बसेल का ?'

मग नामा देवळात निमित्तानेच जाऊ लागला. काकडा, पूजा, सायं आरती आणि शेजारती; बाकी घरात राहू लागला. कोणी गावकरी, वारकरी बोलवायला आला तर गोड, सौम्य शब्दांत नकार देऊ लागला. गोणाईला मनापासून बरे वाटत होते. टाके मारून

कापड कसे जोडावे, मोजून कापावे कसे, बेतावे कसे, शिवण घट्ट कशी असावी याचे ज्ञान दामाशेटी नामाला देऊ लागले. आधी अखंड कापडाचे तुकडे करायचे, मग ते परत सुईने टोचून धाग्याने एकत्र विणायचे, नामाला मोठे आश्चर्य वाटले. धोतर, मुंडासे, कोपरी, अंगरखा, लंगोटी अशी पुरुषांची वस्त्रे तर चोळी, झंपर, लुगडी अशी स्त्रियांची वस्त्रे. लहान मुलांची अंगडी, टोपडी, झगे वेगळे. यामध्ये परत कापड कमी दर्जाचे, चांगल्या दर्जाचे, उत्तम दर्जाचे. कमी दर्जा ते उत्तम दर्जा चढता भाव. रेशमी झुळझुळीत वस्त्रे, रेशमी पीतांबर, रेशमी लुगडे यांचा भाव तर विचारायलाच नको. ऐकून ऐकून नामाचे मस्तक गच्च गच्च झाले. दामाशेटी त्याला परोपरीने व्यवसाय उदीम सविस्तर समजून सांगत होते. गोणाई मनोमन म्हणत होती, 'विठ्ठलाची कानउघाडणी केली त्याचा चांगला परिणाम झाला. नामा रांगेला लागला. बाजारदिवस जवळ आला आहे. यावेळी मंगळवेढ्याच्या बाजारात नामालाच पाठवायचा यांचा बेत आहे. एकदा बाजाराचं जमलं की जिंकलंन सारं. देवा, नामा तुझाच आहे. तूच यश दे त्याला.'

उद्या बाजाराचा दिवस. आज रात्री नामाला धड जेवणही गेले नाही. त्याला पार बांधून टाकल्यासारखे झाले होते. भजन नाही, कीर्तन नाही, टाळ-मृदंगाचा नाद नाही, नामसंकीर्तनही नाही. रात्री झोप लागेना. मध्यरात्री केव्हातरी झोप लागली. स्वप्नी पांडुरंग आला. नामाने हात जोडले. "केशवा, मधुसूदना, मला काही हा व्यवसाय, बाजार करणं जमणार नाही बाबा. माझं मनच रमत नाही त्यात." विठ्ठल प्रसन्न हसून अंतर्धान पावला. नंतर नामाला झोपच

लागली नाही. तळमळत तसाच पडून राहिला. पहाटे उठून प्रातर्विधी, स्नान उरकून तो देवळात काकड्याला गेला. काकड्यावेळीही त्याच्या मनी बाजाराची चिंताच होती. आईने भाजी भाकरी वाढली. एका स्वच्छ फडक्यात दोनतीन भाकरी, त्यांच्या मधोमध भाजी असे दुपारचे जेवण बांधून दिले. दामाशेटी आज लवकर देवाला नैवेद्य दाखवून आले. नामदेवाने कसेबसे जेवण उरकले. जनाबाई, आऊताई एकमेकीत कुजबुजत, हसत होत्या. दामाशेटींनी कापडांची बोचकी बांधली. ती घोड्यावर लादली. धोतर, कोपरी, वर अंगरखा, डोईला टोपी असा वेश करून नामा बाजारला जायला तयार झाला. जाताना गोणाईने नामाच्या हातावर दही-साखर ठेवली. ती मोठ्या उत्साहात म्हणाली, ''नामा, बाजार करून लवकर ये. आज मी तुझ्यासाठी खीर आणि वडे करणार आहे.''

तो मजल दरमजल करत घोडा घेऊन मंगळवेढ्याला आला. ओझे घोड्याच्या पाठीवर पण नामाचे मन त्याहून जास्त ओझे आपल्याच पाठीवर असल्यासारखे भारावून गेलेले. बाजारात व्यवसाय करण्यासाठी बाजारप्रमुखाच्या कचेरीत पट्टी भरली. एका झाडाखाली घोडा बांधला. त्याच्यासमोर हिरवागार चारा घातला. त्याच्या पाठीवरची ओझी घेऊन बाजारात आला. एका बाजूची जागा पाहून त्यानं गाठोडी सोडली. आत्तापर्यंत बाजार दुकानदारांनी भरून टाकला होता. काही जणांची मांडामांड सुरू होती. मांडामांड झालेले चालून, मांडामांड करून थकले होते, भुकेजले होते. गिऱ्हाईक येईपर्यंत त्यांनी घरून आणलेली भाकर सोडून खायला सुरुवात केली होती. नामानेही इतरांची मांडामांड बघून आपले कपडे त्या त्या प्रकारानुसार

वेगवेगळे मांडले. त्यानेही इतरांप्रमाणे गोणाईने मोठ्या प्रेमाने दिलेली भाकर सोडली. भाकर मोडली, भाजी लावून तो तुकडा तोंडात घातला. पण तो घास तोंडातच फिरू लागला. खाण्याची इच्छाच नव्हती. बाजूला दोन कुत्री लांबलांब जिभा काढून उसासत, धपापत उभी होती. पोटातली भूक त्यांच्या डोळ्यांत दिसत होती. नामाने त्यांच्याकडे पाहिले. त्याने बाजूच्या एका दगडावर भाजी-भाकरी नेऊन ठेवल्या. दोन्ही कुत्र्यांनी काही क्षणातच त्यांचा फडशा पाडला.

नामा परत आपल्या जागी आला. आता बाजार भरलेला होता. लोखंडी भांडी, मातीची भांडी, चपला, सुतळी-काथ्या, कापड, कपड्यांचे प्रकार, तांदुळ-गहू-जोंधळा, डाळी, मिठाई, फळं, भाजी, गुळाचे रवे, मातीची खेळणी, साखरेची खेळणी अशी वेगवेगळी दुकाने थाटून विक्रेते उभे होते. खरेदी-विक्रीचे व्यवहार सुरू झाले होते. बाजाराकडे पाहून नामा गोंधळून गेला होता. विठ्ठलाचा सतत धावा करत होता. एक म्हातारा नामाच्या दुकानासमोर येऊन उभा होता. जख्ख म्हातारा होता तो. अंगभर सुरकुत्या असलेला. रंगाने काळाकुट्ट. कंबरेला फक्त लंगोटी होती त्याच्या. हातात काठी घेतलेला, बोडक्या डोक्याचा, खोल गेलेल्या डोळ्यांचा. त्या डोळ्यांनी कपड्यांकडे आशाळभूतपणे बघत उभा होता. नामा त्या म्हाताऱ्याकडे पाहून म्हणाला, ‘‘आजोबा, काय हवंय ?’’ म्हातारा हसला आणि म्हणाला, ‘‘समदंच पायजे आनी काय बी नगं !’’ ‘‘का हो ? असं का म्हणता ?’’ नामाने विचारले. ‘‘पोरा, कापडं न्हाईत म्हणून मी असा उगडा वागडा हाय. कंबरंला, खांद्याला, डोईला समदीकडंच कापडं पायजेत. पन माज्याकडं रुका-पैसा कायबी न्हाई. म्हणून मला

कायबी नगं." म्हातारा म्हणाला. नामाला फार वाईट वाटले. तो म्हणाला, "आजोबा, असं म्हणू नका. पैसा नाही म्हणून तुमच्या वयाच्या माणसानं उघडं राहावं हे चांगलं नाही." नामाने धोतर, बाराबंदी, मुंडासे तिन्ही कपडे आजोबांपुढे केले. म्हातारबाबांच्या डोळ्यांमधून अश्रू गळू लागले. ते म्हणाले, "पोरा, लै देवगुनाचा हाईस तू. पन मला ही कापडं नगंत." नामा म्हणाला, "आजोबा, मी प्रेमानं देतोय. तुम्ही माझ्या आजोबांच्या वयाचे आहात." पालथ्या हाताने डोळ्यांमधले अश्रू पुसत म्हातारबाबा म्हणाले, "ही शिरीमंती मी येकलाच कशी भोगू ? घरी म्हातारी हाय, आजारून पडलेला पोरगा हाय, सून हाय, दोन न्हानगी नातवंड हाईत, ती तर नागडीच असत्यात. घरातला वयस्कर मी आनी मी येकल्यानंच आसं सुक भोगनं बरं दिसंल का ?" नामाचे मन गहिवरून गेले. तो म्हणाला, "दादा, घरचे सर्वांत ज्येष्ठ तुम्ही. कर्तेपणाचं कर्तव्य विसरला नाहीत. विठ्ठलकृपेनं खूप कपडे आहेत. घेऊन या घरच्या मंडळींना. कोणालाच उघडं राहायला लागणार नाही." त्या म्हातारबाबांनी नामाचा चेहरा निरखून पाहिला. निर्व्याज, निखळ, निर्मळ भाव असलेला चेहरा.

म्हातारबाबा घरातल्या सगळ्यांना बोलावून आणण्यासाठी गेले. नामाने सगळ्या बाजारवर नजर फिरवली. त्या गर्दीत गरीब-फाटके केवळ आशाळभूतपणे नेत्रसुख घेत फिरत होते, तर मध्यम प्रत्येक खरेदी करताना खिसा चाचपत होते. श्रीमंत मात्र जे हवे ते भराभर घेत होते. एका बाजारात कसा भेदभाव ! वास्तविक विकणारे व्यावसायिक; पण त्यांच्याही शिंपी, तांबट, लोहार, चांभार, सुतार

अशा जातीपाती झालेल्या. त्यातून परत भेदभाव निर्माण झालेला. नामा खिन्न झाला. विठ्ठलाचा धावा करू लागला. "देवा, सारी तुझी लेकरं, मग परिस्थितीपासून व्यवसायापर्यंत भेदभाव, दुरावा का ? कर्मातली भिन्नता बंधुत्वाच्या आड का यावी ?" विचार करकरून नामाचे डोके जड झाले. तोवर म्हातारबाबा सगळ्या कुटुंबाला घेऊन आले. नामाने सगळ्यांना अंगभर कपडे दिले. सगळ्यांनी त्याला तोंड भरून आशीर्वाद दिले. नामाला द्यावे असे तेवढेच त्यांच्याजवळ होते. म्हातारीने तर नामाच्या दोन्ही गालांवरून हात फिरवले. आपल्या मस्तकाच्या दोन्ही बाजूंना बोटे कडाकडा मोडली. "इट्टलच भेटला बग तुज्या रूपात. लै मोटा होचील रं माज्या लेकरा."

नामा त्यांच्या स्तुतीने गुदमरून गेला. पण यामुळे त्या वस्तीतले सारेच उघडे वागडे नामाकडे धावले. नामानेही त्यांना मोठ्या प्रेमाने कपडे दिले. आजूबाजूचे व्यावसायिक नामाचा हा अजब व्यवहार पाहात होते. बघता बघता नामाचे दुकान मोकळे झाले. दुपार उलटून गेली होती. नामा विठ्ठलनामात रंगून गेला होता. एका म्हाताऱ्याच्या खाकरण्याने भानावर आला. नामाच्या दुकानात काही उरले नव्हते. कमरेला केवळ लंगोटी असलेल्या म्हाताऱ्याच्या डोळ्यांमध्ये नैराश्य दाटले. नामाने ते ओळखले. नामाने आपल्या अंगावरचा अंगरखा काढला, धोतर सोडले, टोपी पण काढली. म्हातारा नको नको म्हणत असताना त्याने ते कपडे त्याच्या हाती कोंबले. आता नामाच्या कमरेला लंगोटी आणि अंगावर कोपरी एवढीच वस्त्रे उरली होती. नामा आपल्या घोड्याकडे धावला. त्याला मोकळा केला आणि पंढरपुरची वाट धरली. वाटेत एका ओढ्यावर फक्त घोड्याला

पाणी पाजण्यासाठी थांबला. पंढरपुरात प्रवेश केल्यावर घोड्याला घरवाटेवर सोडले. घोड्याला ती वाट सवयीची होती. घोडा नीट घरी आला. नामा शरीरापेक्षा मनाने खूप-खूप थकला होता. थेट पुंडलिकाच्या मंदिरी धावला. तिथल्या थंडगार पाषाणावर आपले अंग टाकले. हाताचे उसे केले. क्षणमात्रात त्याला गाढ निद्रा लागली.



# ५ - नामाचा विवाह

गोणाईने खीरवड्यांची तयारी केली होती. स्वयंपाकात आऊताई आणि जनाबाई दोघीही तिला मदत करत होत्या. दामाशेटी बाहेरून आले. ओसरीवर डोक्याला हात लावून बसले. एवढ्यात अश्व आला. आपल्या ठिकाणी जाऊन स्थिर झाला. अश्व आला पण नामा आला नाही. दामाशेटी उठून दरवाजाबाहेर गेले. इकडे तिकडे बघू लागले. नामा दिसेना. आऊताईने बाबांची अस्वस्थता पाहून विचारले, ''बाबा, नामाची वाट बघताय का ? पहिल्यांदाच बाजारात गेलाय. येईल इतक्यात.'' गोणाई तिचीच बाजू घेत म्हणाली, ''पोर बिचारं बाजारात गेलं, पहिलाच दिवस त्याचा. वेळ लागणारच.'' यावर दामाशेटी म्हणाले, ''बाजारात गेलेला घोडा आला घरात. एकटाच परत आला. त्याच्याबरोबर नामा मात्र नाही आणि बाजारव्यवहार म्हणशील तर आपल्या लेकरानं चांगलाच पराक्रम गाजवलाय. परत या दामाशेटीनं आपलं नाव कुणाला सांगता नये.'' ''माझ्या नामाला एकदम असा का हो बोल लावता ?'' गोणाईनं विचारलं. ''आपला नामा बोल लावण्याच्या पलीकडं गेला आहे. गावभर त्याचीच चर्चा

सुरू आहे. विश्वासाचं माणूस असेल तरच उधार दे. शक्यतो उधारीच नको. बजावून सांगितलं होतं त्याला. पण ऐकेल तर तो नामा कसला ! सगळे कपडे गोर-गरीबांना वाटून टाकले म्हणे त्यानं. 'विठ्ठल-विठ्ठल' म्हणे ! आम्हीसुद्धा त्या विठ्ठलाचेच भक्त आहोत. पण जीवनात प्रपंच आहे, संसार आहे. तो चालवण्यासाठी व्यापार-उद्योग केलाच पाहिजे. एकच मुलगा आपला. त्याला आपलं कर्तव्य कळायला हवं. या पोरापुढं काय करावं तेच कळत नाही.'' दामाशेटी म्हणाले.

बराच वेळ कोणी काहीच बोलले नाही. स्वयंपाकाचे आवरल्यावर हात धुऊन पदराला पुसत गोणाई बाहेर आली. ''हे बघा, तिन्हीसांज टळून चाललीय. नामाला आपली चूक कळली असणार. त्याला खूप वाईट वाटलं असणार. म्हणूनच तर त्यानं घोड्याला पुढं पाठवलंन. कुठं तरी देवळात स्वारी बसली असणार विचार करत ! मी देवापुढं तेलवात करते. नामा आला तर त्याला एकदम रागावू नका. नंतर समजून देता येईल. एक दिवस फार तर तुम्ही आणि नामा दोघं मिळून बाजारात जा. त्याला प्रत्यक्ष समजून, दाखवून द्या. होईल तयार हळूहळू. मला तर वाटतंय की त्याचं लग्नच लावून द्यावं. संसाराची जबाबदारी पडली की आपोआप उद्योग करायला लागेल.'' गोणाई तेलवात करायला गेली. दामाशेटी भिंतीला डोके टेकून निःशब्द बसून राहिले. रात्रीची जेवणवेळ टळून गेली. नामा आत्ता येईल, मग येईल म्हणून घरातले सारे वाट बघत होते. गोणाईचे डोळे सतत गळत होते. पदराने डोळे पुसत ती सारखी दरवाजाकडे येत होती. पाने मांडून ठेवली होती. शेवटी दामाशेटी उठले. नामाचा

शोध घ्यायला बाहेर पडले. त्यावेळी रस्त्यावर वर्दळ नव्हती. दुकाने बंद झाली होती. एखादा माणूस येताजाता दिसत होता. दामाशेटी विचारे, "दादा, आमचा नामा कुठं दिसला का ?" "नामा व्हय, न्हाई बा," उत्तर मिळे. कोणी म्हणे, "आजून घरी आला न्हाई ? बाजारात हुता की आज." दामाशेटीने प्रत्येक देऊळ पालथे घातले. शेजारती होऊन देवळांची दारे बंद झाली होती. दामाशेटींनी वाळवंटही पायाखाली घातले. शेवटी निराश होऊन ते घरी परतले. आऊ, जनी, गोणाई नामाची चातकाप्रमाणे वाट बघत होत्या. आऊ, जनी मुसमुसत होत्या. गोणाईचे डोळे रडून रडून लाल झाले होते. दामाशेटी घरात आले. भिंतीला टेकून घोंगडीवर बसले. त्यांनाही हुंदका फुटला. गोणाई एकदम उठली. खीर-वडे, केलेला सगळा स्वयंपाक तिने गोठ्यात नेऊन जनावरांसमोर ठेवला. घरातले तेलदिवे बारीक केले. सारेच उपाशीपोटी घोंगडीवर आडवे झाले. दामाशेटी चिंतेने ग्रस्त झाले होते. गोणाईचे डोळे वाहात होते, मन म्हणत होते,

**सांडोनि घरदार आपुला संसार। नाचतां विचार न धरिसी।।**
**नव्हे तें करितां कोण असे वारिता । परि त्वां आपुल्या हिता प्रवर्तावें।।**
**मी एक आहे तंव करीन तळमळ । मग तुझा सांभाळ करील कोण।।**
**या विठ्ठलावांचुनी तुज नाहीं रे संसार । हा बोल निर्धार सत्य माझा।।**
**कोण्या गुणें तूंवा घेतलें धरणें । गोणाई म्हणे करणें फळासी आलें।।**

(श्रीनामदेवमहाराजांची अभंगगाथा - १२७५)

सकाळ झाली. दामाशेटींचे घर जागेच होते. फक्त उठून सकाळची नित्य कर्मे करू लागले. दामाशेटी कोणाशीही न बोलता

घराबाहेर पडले. पुन्हा नामाचा शोध सुरू. जाणायेणाऱ्यांना ते ''माझा नामा कुठं दिसला का हो ?'' असे विचारू लागले. कोणी एकांनी सांगितले, ''नामा, मघा मी विष्णुपदाकडं जाताना पाहिलं त्याला.'' दामाशेटी मोठ्या वेगाने विष्णुपदाकडे गेले. कंबरेला लंगोटी आणि अंगात कोपरी, अशा वेशात तो विष्णुपदी मग्न झालेला होता. नेत्र मिटलेले होते, मुख गात होते;

**आतां माझी चिंता तुज नारायणा । रुक्मिणीरमणा वासुदेवा ॥**
**द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरविलीं । धांव त्वां घेतली गजेंद्रासी ॥**
**उपमन्या आळी तुवां पुरविली । अढळपदीं दिली वस्ति ध्रुवा ॥**
**नामा म्हणे करा करुणा केशवा । तूं माझा विसांवा पांडुरंगा ॥**

(संत नामदेवमहाराजांची अभंगगाथा - १७००)

काही क्षण दामाशेटी त्याच्या त्या तन्मय रूपाकडे तसेच पाहात राहिले. नंतर त्यांच्या मुखामधून ''नामा,'' असे उद्‌गार बाहेर पडले. नामा भानावर आला. त्याने पितृचरणांना घट्ट मिठी मारली. दामाशेटींनी त्याला उठवले, दृढ आलिंगन दिले. ''नामा, अरे असा आमचा जीव टांगणीला का लावलास ? आऊ, जनी आणि तुझी आई. तुझ्या आईची अवस्था काय झाली असेल, याचा विचार तरी केलास का ? कोणी मुखात घास घातला नाही. रात्रभर कोणाला झोप नाही. सारीजणं जागी. तुझ्या चिंतेनं हैराण. असा का रे वागलास आमच्याशी ? चल, घरी चल !''

दोघेही घरी आले. आल्याआल्या नामा आईच्या चरणांवर कोसळला. ''आई, चुकलो मी. मला क्षमा कर. मी तुझा, बाबांचा

सगळ्यांचाच अपराधी आहे.'' गोणाईने नामाला घट्ट उराशी धरले. तिच्या मुखातून शब्द फुटेनात. शब्दांचे काम जणू अश्रूच करत होते. थोड्या वेळाने ती उठली. चुलीजवळ गेली. ''सगळं घर काल रात्रीपासून उपाशी आहे. आऊ, जना इकडं या. थोडा गूळ चिरून द्या. ती तुपाची लोटी घ्या. गोडाचा सांजा खाऊन निदान दूध पिऊन घ्या.'' जना म्हणाली, ''सांजा आणि तोही गोडाचा. नैवेद्य कोणाला दाखवायचा ?'' यावर गोणाई उत्तरली, ''दाखवायचा त्या विठ्ठलालाच. त्याच्यामुळंच नामा परत दिसला म्हणायचा. नामा आपला व्हावा म्हणून त्यालाच खुश ठेवावं लागणार ना !''

दामाशेटींनी स्नान उरकले. देवपूजा सुरू केली. मुखाने स्तोत्रे, अभंग म्हणणे सुरू होते. पूजा, नैवेद्य झाला. नामानेही स्नान उरकून देवांना नमस्कार केला. विठ्ठलाच्या राउळी धाव घेण्याची इच्छा अनावर झाली होती. पण ती त्याने महत्प्रयासाने दाबून टाकली. पण गप्प बसेल ते मन कसले ?

**काय पांडुरंगा सांग म्यां करावें । शरण कोणा जावें तुम्हांविण ।।**
**पाहतांना वाट भागले लोचन । कठिणच मन केलें तुवां ।।**
**ऐकीली म्यां कानीं कीर्ती तुझी देवा । उठलासे हेवा त्याचि गुणें ।।**
**अनाथ अन्यायी काय मी करीन । दयावंता खूण सांगसी तूं ।।**
**नामा म्हणे आस पूर्ण कीजे देवा । रूपडें दाखवा नेटें पाटें ।।**

(संत नामदेवमहाराजांची अभंगगाथा - १५९५)

गोणाईचा सांजा झाला. द्रोणामधून तिने सर्वांना दिला. नामा म्हणाला, ''आई, तूही घे. तू सुद्धा कालपासून काही खाल्लेलं

नाहीस. सारीजणच खाऊ.'' गोणाईने स्वत:साठीही घासभर सांजा घेतला. दामाशेटी म्हणाले, ''नामा, ईश्वरभक्ती आहेच. पण गृहस्थाश्रमातलं कर्महीे तितकंच महत्त्वाचं आहे. आता तुझं लग्न करावं, असा तुझ्या आईचा आणि माझाही विचार आहे. आपला हा परंपरागत व्यवसाय. सुई, सातुळी, कात्री, गज, दोरा या वस्तूंशी आपला संबंध. ईश्वरसाक्षीनं प्रामाणिकपणानं व्यवसाय करावा. प्रपंच-व्यवहार सांभाळावा. सकाळी देवपूजा करावी. व्यापार-उदीम झाल्यानंतर संध्याकाळीही देवाचं नामस्मरण करावं. आपले पूर्वज असं जीवन जगत आले आहेत. तू काल बाजारात जो व्यवहार केलास, त्यानं या दामाशेटीचं जे नाव होतं तेच बदनाम झालं. दानधर्म करावा की, पण आपलं सर्वस्व गमावून करायचा ! आता तू त्या विठ्ठलाचा नाद जरा कमी कर. परंपरागत आपण विठ्ठलभक्त आहोतच. पण प्रपंचात फक्त तेवढंच करून भागत नाही. कळतंय ना तुला हे ?'' दामाशेटी नामाच्या चेहऱ्याकडे बघून बोलायचे थांबले.

नामा काहीच बोलला नाही. तो मनात म्हणत होता, ''देवा, तुझ्या भक्तीचं पिसं लागलं. त्याच डोळ्यांनी जग पाहिलं. ते सगळं करुणामय दिसलं. किती भेद रे देवा; जातिभेद, वर्णभेद. कोणी धनिक तर कोणी दरिद्री; तर कोणी या दोन्हींच्या मधल्या अवस्थेत, सतत उद्याची काळजी करणारा ! यासाठीच का रे हे माणसाचं जीवन ? हेच मी करायचं ? कोणाला ठकवलं नाही, की मी म्हणे सज्जन. पण न ठकवता व्यवहार करणं ही सहजजीवनाचीच पद्धती आहे ना ? व्यवहार याचाच अर्थ हे माझं, हे तुझं ! दान याचाच अर्थ

मी कोणी देणारा आणि तो कोणी घेणारा ! माझा हात वर आणि त्याचा हात खाली. यासाठीच आयुष्यातला तीन-चतुर्थांश काळ घालवायचा. नाही देवा, मला हा प्रपंच-व्यवहार जमायचा नाही. मला तुझ्याशिवाय एक क्षणही करमत नाही. कुठं परगावी कीर्तनाला गेलो तरी कधी एकदा परतून तुझं दर्शन घ्यावं, असं माझं होतं देवा.

**तुझ्या पायीं चित्त रंगलेंसे माझें । नाहीं केशीराजे ऐसें केलें ।।**
**उठवितां काय होईल संतोष । मज अभाग्यास मोकलीलें ।।**
**प्रपंच काबाडीं न घाली मज दृढ । नको वाडें कोड झणीं देवा ।।**
**नामा शिंपियाचा विनवी समस्तां । नको भंगूं आतां प्रेमपान्हा ।।**

(संत नामदेवमहाराजांची अभंगगाथा - १६१८)

दुपारी दामाशेटी गोणाईला म्हणाले, ''ऐकलंत, आपला नामा काही हा आपला परंपरागत शिंप्याचा व्यवसाय करणार नाही, असं दिसतंय.'' गोणाई म्हणाली, ''त्याचं एकदा लग्न लावून दिलं पाहिजे. बायकापोरांची जबाबदारी गळ्यात पडली की आपोआप काम करायला लागेल.'' अगदी त्याच दिवशी संध्याकाळी एक गृहस्थ दामाशेटींकडे आले. धोतर, बाराबंदी, डोईला पागोटे, गळ्यात तुळशीमाळ, भाळी चंदनटिळा असे मुखावरून भाविक-सज्जन गृहस्थ, मध्यम वयाचे वाटणारे. 'या बसा', गूळपाणी झाले. त्या गृहस्थांनी आपला परिचय करून दिला. त्यांचे नाव सदावर्ते होते. ते नामदेवाशी आपली कन्या राजाई हिचा विवाह व्हावा, या इच्छेने आले होते.

दामाशेटींनी त्या गृहस्थांचे सगळे म्हणणे ऐकून घेतले. नंतर ते

चिंतायुक्त स्वरात म्हणाले, "आमचा नामा प्रपंच करीलसा वाटत नाही. खरं तर आमचा परंपरागत शिंप्याचा व्यवसाय. नामा एकुलता एक. त्यानंच हा व्यवसाय पुढं चालवायचा आहे. अनेकवार त्याला समजून द्यायचा प्रयत्न केला. त्याची आईसुद्धा याच काळजीनं व्यापलेली असते. त्यामुळंच तो प्रपंच तरी नीटपणे चालवील का नाही, याबद्दलही आम्हांला खात्री वाटत नाही. विठ्ठलाशिवाय त्याला काहीच सुचत नाही." यावर सदावर्त्यांनी आपल्या मुलीच्या कुंडलीचे टिपण दिले. ते म्हणाले, "काल बाजारात मी तुमच्या मुलाचा व्यवहार पाहिला. या सगळ्या अलौकिक गोष्टी आहेत. तुमच्या आमच्या प्रापंचिक व्यवहारांच्या कितीतरी पलीकडच्या आहेत. त्यालाच माझी मुलगी देण्याचा विचार असल्यामुळे मी बारकाईनं पाहात होतो. भक्तीचं वरदान लाभलेली, करुणेनं व्यापलेली अशी त्याची बाजारातील कृती होती. तुमच्या मुलाच्या रूपात निदान मला तरी विठ्ठलदर्शन झालं. आणि माझ्या मतानं बरं का, अशा भक्तिभावानं वेड्या असलेल्या लोकांचे प्रपंच स्वतः पांडुरंगच चालवतो."

सदावर्त्यांचे बोलणे ऐकून दामाशेटी भारावून गेले. त्यांनी नामाची कुंडली त्यांना दिली. कुंडल्या जुळल्या. सदावर्त्यांची राजाई दामाशेटी रेळेकर यांची सून झाली. मातापित्यांच्या आज्ञेने नामाने विवाह केला. मन म्हणत होते,

**पंढरी निवासा सख्या पांडुरंगा। करी अंगसंगा भक्ताचिया।।**
**भक्त कैवारीया होसी नारायणा। बोलतां वचन काय लाज।।**

मागें बहुतांचें फेडियलें ऋण । आम्हांसाठी कोण आली धाड।।
वारंवार तुज लाज नाहीं देवा । बोल रे केशवा म्हणे नामा।।

(संत नामदेवमहाराजांची अभंगगाथा - १७७३)



## ६ - भक्ताघरी साक्षात हरी !

आधीं रचिली पंढरी । मग वैकुंठ नगरी।।
जेव्हां नव्हतें चराचर । तैं होतें पंढरपूर।।
जेव्हां नव्हती गोदा गंगा । तेव्हां होती चंद्रभागा।।
चंद्रभागेचे तटीं । धन्य पंढरी गोमटी।।
नासिलीया भूमंडळ । उरे पंढरीमंडळ।।
असे सुदर्शनावरी । म्हणुनि अविनाश पंढरी।।
नामा म्हणे बा श्रीहरी । ते म्यां देखिली पंढरी।।

(संत नामदेवांची अभंगगाथा - २१३४)

रकट्याची लंगोटी नेसून नामाचे सवंगड्यांसमोर कीर्तन सुरू होते. स्थळ होते चंद्रभागेचे वाळवंट. ''नामा-नामा, कीर्तन कर की, लै गोड लागतंय बग,'' सवंगड्यांच्या लडिवाळ आग्रहाने नामा आज वाळवंटी कीर्तनरंगात रंगला. भोवतीने सवंगडी. नंतर स्नानाला आलेले वारकरी. हळूहळू गर्दी वाढली. नामयाचे कीर्तन रंगू लागले.

आता नामा एकटा नव्हता. त्याचा विवाह झाला होता. त्याच्या वागण्यात तिळमात्र फरक नव्हता. नामयाची शिष्या जना आता नामयाच्या घराच्या आवारातच एक खोपटं बांधून तिथे राहात होती.

ती मात्र खरी कर्मयोगिनी होती. नामयाच्या घरची कामे, आपली कामे. केर काढणे, जमीन सारवणे, शेण गोळा करून शेणी थापणे, दळण-कांडण करणे अशी कामे करत असे. पण प्रत्येक क्षणी, श्वासोच्छ्वासात पांडुरंग असे.

**दळितां कांडितां । तुज गाईन अनंता॥**
**न विसंबे क्षणभरी । तुझें नाम गा मुरारी॥**
**नित्य हाचि कारभार । मुखीं हरि निरंतर॥**
**मायबाप बंधुबहिणी । तूं बा सखा चक्रपाणी॥**
**लक्ष लागलें चरणासी । म्हणे नामयाची दासी॥**

(संत जनाबाईंचे अभंग - २०७)

नामामध्ये मात्र लग्न होऊनही तिळमात्र बदल तो नव्हता. दामाशेटी, गोणाई आणि आता राजाईसुद्धा. प्रपंच, व्यवसाय करता करता विठ्ठलभक्ती करावी, असे त्याला वारंवार सांगत असत. नामाचे मात्र 'विठ्ठल विठ्ठल, पांडुरंग !' एक दिवस असाच नामा सवंगड्यांसमवेत गेला तो आलाच नाही. जनाबाई पांडुरंगाचे नाम घेत घेत शेणी थापत होती. ती गावभर वणवण करायची. डोईवरच्या पाटीमध्ये शेण गोळा करायची. त्याच्या गोवऱ्या थापायची, वाळवायची. नाम्याची चिंता करणाऱ्या गोणाईने जनीकडे पाहिले. मनी म्हणाली, "किती कष्टाळू गं माझी जनाबाई !" पण तिच्या मुखातले 'विठ्ठल विठ्ठल' ऐकले मात्र आणि परत मनी उद्‌गारली, "ही सुद्धा नाम्यासारखीच !" उघड म्हणाली, "अगं जना, नामा अजून घरी परत आला नाही गं. लग्न झालंय, ह्यांना आताशा पूर्वीसारखं

शिवणं-टिपणं जमत नाही. घोड्यावरून प्रवासही जास्त नाही करवत. मुलगा हाताशी आला म्हणता म्हणता हातून निसटला बघ. जा जरा तो कुठं आहे ते बघ. आण शोधून त्याला.'' जनाने शेणाने माखलेले हात धुतले आणि डोईवर पदर घेऊन निघाली.

जनाला ठाऊक होते, नामदेव राउळी तरी असणार, नाहीतर वाळवंटी असणार. उद्योगही ठरलेला, काथ्याचा करदोटा आणि रकट्याची लंगोटी अशा वेशात कीर्तन. पण कीर्तन मात्र भक्तिभावाने भरलेले. ईश्वराच्या प्रेमाने ओथंबलेले. अतिशय तन्मय होऊन नामदेव कीर्तन करी. त्या तन्मयतेमुळे जी अपूर्व अशा भक्तिरसाची निर्मिती व्हायची, तिला दुसरी उपमाच नसे. सारे श्रोते, वारकरी भान हरपून ऐकत राहायचे. राउळात नामा नव्हता. जनी वाळवंटी आली. नामा तिथे होता. स्वत: नामा कीर्तनात रंगला होता. मोठा जनसमुदाय भोवतीने होता. तोही भान हरपून, तल्लीन होऊन ऐकत होता.

**श्रीधरा अनंता गोविंदा केशवा । मुकुंदा माधवा नारायणा॥**
**देवकीतनया गोपिकारमणा । भक्तउद्धारणा केशिराजा॥**
**मकरकुंडलें श्रवणीं शोभती । येकावळी दिप्ती सृष्टि लोपे॥**
**नामा म्हणे तुझा न कळेची पार । भजती निरंतर भक्तजन॥**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २१६३)

जनीचे भान हरपले. कीर्तनाने ते विलक्षण सुखावले. एवढ्यात त्या गर्दीत तिला तेजोमय प्रकाश दिसला. सगळा समुदाय 'रामकृष्ण हरी, जयजय रामकृष्ण हरी। जयजय विठोबा रखुमाई' करत आनंद कल्लोळात गात गात नाचत होता. तो तेजोमय प्रकाश कुणामुळे

पडला होता ? ''अगंबाई, हा तर माझा विठुराया ! खरंच गं बाई ! पीतांबर, शुभ्र बाराबंदी, तुळशीच्या माळा, डोईला मुगूट मोरपीस आहे का ? होय होय, तेही डोकावतंय ! हाच माझा सावळा विठ्ठल !'' जनाबाईने त्या विठुरायाचे दर्शन घेतले. तिच्या डोळ्यांमधून आनंदाश्रू वाहू लागले. कीर्तन संपले. गर्दीतून विठुराया अंतर्धान पावला. सारी गर्दी ओसरल्यावर जनीने नामयाच्या पायी डोई ठेवली. ''आज मी धन्य झाले. नामदेवा, तुमचं कीर्तन ऐकण्यासाठी स्वत: विठ्ठल आले होते. तेही रंगून गेले होते. कीर्तनरंगात नाचत होते. मी माझ्या या डोळ्यांनी पाहिलं.'' जनीच्या मुखावरील आनंद पाहून नामयाला दाटून आले. तो म्हणाला, ''तू एकटीनं पाहिलास, मला नाही दाखवलास.'' ''तुम्ही तर कीर्तनात इतके तल्लीन झाला होता की ती तादात्म्यता भंग करू नये असंच वाटलं मला,'' जनी म्हणाली, ''आणि आपण जाणताच, आपण स्वत: देव बघू शकतो. तो दुसऱ्याला दाखवता येत नाही. देव दुसऱ्याला दाखवण्याचं सामर्थ्य केवळ सद्गुरूंच्या ठायी असतं. आपण भक्तीच्या वाटेने चालत राहायचं. देवदर्शनाची अनुभूती हा तर आनंदाचा कळस !'' बोलता बोलता ती भानावर आली, म्हणाली, ''चला चला, घरी सगळी मंडळी वाट बघताहेत. मी तुम्हांला बोलवायला आले आणि मीही वेड्यासारखी... चला.''

दिवसांमागून दिवस सरत होते. जनाबाई आणि इतर बायका शेणी म्हणजेच गोवऱ्या लागून असलेल्या घरांच्या भिंतीवर थापून ठेवत. वाळल्या की गोळा करून हाऱ्यात भरून आपल्या घरी नेत. एक दिवस जोराचे वादळ सुटणार, पाठोपाठ पाऊसही येणार असे

हवामान झाले. जना तिच्या गोवऱ्या काढून हाऱ्यात गोळा करू लागली. तेवढ्यात एक बाई पुढे आली, ''ए जने, त्या गवऱ्या मी थापल्यात.'' दुसरी पुढं होऊन म्हणाली, ''परवा माज्या गवऱ्या बी कमीच भरल्या.'' जना म्हणाली, ''मी तुमच्या गोवऱ्यांना कशाला हात लावू ? माझ्या विठुरायाची शपथ. मी फक्त माझ्याच गोवऱ्या घेतल्या.'' पहिली बाई म्हणाली, ''मोठी साळसूद की न्हाई ! इट्टलाची आन घेटली की झालं.'' दोन्ही बाया पुढे सरसावल्या. त्यांनी हाऱ्यातली एकेक गोवरी उचलून घेतली. प्रत्येक गोवरीतून 'विठ्ठल-विठ्ठल' असा ध्वनी निघायचा. त्या बायका थक्क झाल्या. आपण निव्वळ संशयाने जनावर चोरीचा आरोप केला, याचा त्यांना पश्चात्ताप झाला. त्यांनी तिच्यापायी डोई ठेवून क्षमा मागितली.

अपेक्षेनुसार वादळ सुरू झाले. घराची छपरे, छपरांवरची कौले धडाधडा वाजू लागली. विजांचा कडकडाट सुरू झाला. गोणाई, आऊताई, राजाई पार घाबरून गेल्या होत्या. नामा मात्र विठ्ठलचिंतनात निमग्न होता. जना तिच्या खोपटात एकटीच होती. तिच्या खोपटाची या वादळात काय स्थिती झाली असेल, या विचाराने गोणाई उठली सुद्धा. एवढ्यात 'कडाडकाडकाड' असा प्रचंड ध्वनी उमटला. दचकून गोणाई खाली बसली. राजाई, आऊ तिला बिलगल्या. त्या आवाजाने नामा भानावर आला. आपल्या छपरावर कोणी चालते आहे. खापऱ्या वरखाली होताहेत असा भास त्याला झाला. वेगात आलेला झंझावात हळूहळू ओसरत होता. छपरावरचा आवाजही हळूहळू बंद झाला. झंझावात पूर्ण थांबला. गोणाई म्हणाली, ''नामा, आपलं घर एवढं मोठं असूनही हादरलं बघ. ती जना

खोपटात एकटी आहे. काय झालं असेल तिचं, जरा जा आणि बघून ये. मला तिची खूप काळजी वाटतेय बघ."

नामा जनाच्या खोपटाजवळ गेला. खोपटाचे दार बंद होते. आतून मात्र जनाच्या बोलण्याचा आवाज स्पष्टपणे ऐकू येत होता. "सावकाश रे बाबा. मला तर खूप भीती वाटतेय. तुला काही झालं तर ! आणि तू आमची इतकी हलकी कामं करून आम्हांला का लाजवतोस ?... जातोस बाबा, जा." जनाचे बोलणे थांबले. नामाने खोपटाचे दार वाजवले. जनाने दार उघडले. जना पदराने डोळे पुसत होती. "काय झालं गं जना ?" नामाने विचारले, "काही नाही. मला आनंद वाटावा, की दुःख व्हावं तेच कळत नाही. डोळे मात्र गळत राहातात." नामाला काही कळेना. तो म्हणाला, "काय झालं ? आईलाही खूप चिंता लागून राहिलीय. तुझं खोपट लहान. तू एकटी. तुला काही झालं तर नाही ना, तिला भीती वाटतेय." "मी भली चांगली आहे. मला काय होतंय," जना म्हणाली, "मग तुझ्या डोळ्यांत पाणी ?" नामाने विचारले. "काय सांगू ? वादळ सुटलं, पाऊस आला. तुमच्या घरी यायला मी बाहेर पडले तर स्वतः पांडुरंगच आला. त्यानं मला खोपटात जायला सांगितलं. हा स्वतः तुमच्या छपरावर चढला. छप्पर भक्कम केलं. कौलं सारखी केली. माझ्या उरात सारखं धडधडत होतं. पाऊस पडलेला, निसरडं झालेलं, हा पडेल की काय ! तुमच्या छपरावरचं काम झाल्यावर माझ्या खोपटाच्या छतावर गेला. तिथली कौलं सारखी केली. आपल्या पायात याला काही झालं तर! आणि या जगताच्या पालकानं इतकी हलकी सलकी कामं करणं चांगलं का !" जनाच्या

डोळ्यांमधून परत अश्रू येऊ लागले. साक्षात विठ्ठलाने आपले आणि जनाचे छप्पर शाकारले. नामाच्या डोळ्यांतूनही अश्रू गळू लागले. त्याचे हात आपोआप जोडले गेले.

दामाशेटी आणि गोणाई नामाच्या चिंतेने खंगत होते. राजाईची मन:स्थिती वेगळी नव्हती. ती गरोदर होती. दिवस भरत आले होते. आता एक गोजिरवाणे आपल्या जीवनात येणार याचा मात्र तिला आनंद होता. मुलगा होणार की मुलगी ही उत्सुकता होती. अखेर राजाई प्रसूत झाली. मुलगा झाला. चिंतामग्न अवस्थेतही आजी-आजोबांना आनंद झाला. घरात एक चैतन्य निर्माण झाले. कोड-कौतुकाचे अकरा दिवस वेगात गेले. बारावा दिवस, बाळाचे बारसे करायचे.

नेहमीप्रमाणे याही दिवशी नामा घरात नाही. सकाळी राउळात गेला तो आलाच नाही. शोधून मिळाला नाही. बारशाची सगळी तयारी झाली. निमंत्रण दिलेल्या पाच सुवासिनी, शेजारपाजारच्या लेकी-सुना गोळा झाल्या. जो तो नामाची चौकशी करी. एवढ्यात एक जोडपे दामाशेटींची चौकशी करत आले. रेशीमकाठी धोतर, शुभ्र बाराबंदी, डोईवर उंची पागोटे. स्त्रीच्या अंगावर नऊवारी हिरवे लुगडे. अंगावर भरपूर अलंकार. दामाशेटी आणि गोणाई दोघेही या अतिथींना सामोरे गेले. त्या गृहस्थांनी हसतमुखाने नमस्कार केला. ते म्हणाले, ‘‘नमस्कार. मी विठ्ठलशेठ, ही माझी पत्नी रुक्मिणी. आम्ही नवस केला होता. आम्हांला नातू झाला तर पांडुरंगा, पंढरपुरात येऊन तुझं दर्शन घेऊ आणि पंढरपुरातल्या एका बाळंतिणीची ओटी भरू. देवळात दर्शन तर छान झालं. चौकशी केल्यावर तिथंच

माझ्या मुलाचं बारसं केलंत. तुमचंच नाव त्याला दिलंत. याहून माझं सद्भाग्य ते कोणतं !'' नामदेवाने विठ्ठल-रुक्मिणीला हात जोडून मनापासून नमस्कार केला.



# ७ - व्रतनिर्धारी नामदेव

हळूहळू दामाशेटी थकत चालले होते. आता त्यांच्या हातून व्यवसाय होत नव्हता. शरीर वयाने थकत होते, तर मन नामाच्या चिंतेने व्याकूळ होत होते. साठवलेले धन किती दिवस पुरणार ? गोणाई, राजाई दोघींनाही काय करावे ते सुचत नव्हते. कधी कधी तर घरामध्ये धान्य नसे. आपोआप उपवास घडे. उपवास काय आणि भोजन काय, नामा या गावीच नसे. तो विठ्ठलभक्तीत रंगून गेला होता. विठ्ठलाचे तर काय सांगावे ! तो सुद्धा नामाचे कीर्तन ऐकायचा, तल्लीन व्हायचा. एकदा राजाईचे दोन भाऊ पित्याच्या सांगण्यानुसार पंढरपुरला आले. पांडुरंगाचे दर्शन घेऊन ते बहिणीच्या घरी आले. आपले भाऊ आलेले पाहून राजाईच्या नेत्रांत आनंदाश्रू गोळा झाले. तिने त्यांचे स्वागत केले. बसायला घोंगडी अंथरली. पिण्यासाठी पाणी दिले. नंतर मात्र माहेरहून भाऊ आल्याचा आनंद ओसरला. घरात खायला नव्हते. धान्याचा कणही नव्हता. यांना काय द्यावे, हा प्रश्न तिला त्रास देऊ लागला. तेवढ्यात नामदेव घरी आले.

''अहो, ऐकलंत का ? माहेरहून माझे भाऊ आले आहेत,'' राजाई म्हणाली. ''हो का,'' नामदेवांनी त्यांचे नमस्कार करून स्वागत केले. क्षेमकुशल विचारले. राजाईने नामदेवांना बाजूला

बोलावून विचारले, ''यांच्या भोजनाचे काय ? घरात धान्याचा कण नाही. लवकर काही व्यवस्था करावी लागेल ना ?'' नामदेव म्हणाले, ''विठ्ठल-विठ्ठल, असं आहे, आज दशमी. आज एक वेळ जेवण करायचं. घरातून ते जेवूनच बाहेर पडले असतील. रात्री उपासच ना ! उद्या तर एकादशी, उद्या संपूर्ण उपवास. उद्या अवश्य तेव्हा जल प्राशन करावं. बाकी पांडुरंगाच्या स्मरणी रंगून जावं. परवा दिवशी द्वादशी. त्यादिवशी पारणं आणि तोपर्यंत माझा विठुराया अन्नाची सगळी व्यवस्था करेल. शेवटी पारण्याचा नैवेद्य त्यालाच दाखवायचा ना ? विठ्ठल - विठ्ठल !''

**राजाई ते पुसे अहो नामयाला । करा जेवायला कांहीं यांसी**
**प्रात:काळीं घरीं सारूनि भोजन । आले ते चालून माझे भेटी**
**नामा म्हणे कांते दशमी एकभुक्ति । भोजन निश्चिती करूं नये**
**उदईक हरिदिनीं उपवास जागरण । ऐकावें कीर्तन चार प्रहर**
**द्वादशी पारणें झालिया भोजन । ऐकोनि पाहुणे चिंतातुर**
**क्षुधातुर पोटीं निद्रा नलगे कांहीं । वर्षाएवढी पाहीं रात्र झाली**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १७४)

राजाईच्या दोन्ही भावांचे कान या संवादाकडे होते. परवापर्यंत भोजन नाही. भावांच्या पोटात गोळा आला. ती रात्र त्यांना वर्षाएवढी भासली. सकाळी उठून त्यांनी आपल्या गावचा रस्ता धरला.

भाऊ निघून गेले. राजाईच्या नेत्रांमधून अश्रू गळू लागले. तिने आपल्या पतीकडे उद्विग्न मन:स्थितीत कटाक्ष टाकला. नि:शब्द

कटाक्ष म्हणत होता, ''तुमच्या या पांडुरंगभक्तीनं घरची दशा झाली बघा ? एवढ्या कौतुकानं माझे भाऊ आले, तसेच रिकाम्या पोटी परत गेले. आता माहेरी जाऊन ते काय सांगतील ? आता मामंजी थकले. आजारी पडतात सारखे. सासूबाईंनी तरी काय करावं. त्यांचंही वय झालंय. शरीरापेक्षा त्या तुमच्या चिंतेनं जास्त खचल्यात. पोराबाळांचा प्रपंच आपला. त्यांच्यासाठी व्यापार-व्यवसाय नको का करायला ?'' नामदेवांनी राजाईच्या कटाक्षाचा अर्थ जाणला. त्यांच्या मुखी आले, ''विठ्ठल, विठ्ठल !'' राजाईच्या मुखावर अधिकच संताप आला. ती तेथून निघून गेली. पण त्या 'विठ्ठल-विठ्ठल' मध्ये खूपखूप अर्थ होता. नामा म्हणत होता, ''अहो, तुमचं दु:ख मला का उमगत नाही ! बाबांची इच्छा, आईची काळजी, तुमची अस्वस्थता सारं मी जाणतो. पण काय करू ? मला लागलेली भक्तीची आर्त मला सोडत नाही. घरी पाहुणे आले. माहेरातून तुमचे बंधू आले. पण काल खरोखरच दशमी होती ना ! मी स्वत: हे व्रत कठोरपणे पाळतो, हे तुम्हांला ठाऊक आहे ना ? मी एकटाच पुण्यवान का व्हावा ? आलेल्या अभ्यागतांनाही ते पुण्य लाभावं, अशी माझी मनापासूनची इच्छा होती आणि खात्रीनं सांगतो, माझ्या त्या विठुरायानं पारण्यासाठी खूप उत्तम भोजनाची सोय केली असती.''

नामदेव स्वत: कठोरव्रती होते. पुढे कार्तिक शुद्ध एकादशीच्या दिवशी त्यांच्या परीक्षेचा प्रसंग आलाच. एक गरीब ब्राह्मण भिक्षेकरी प्रभातसमयी दारी आला. ''ॐ भवति भिक्षां देहि !'' नामदेवांनी घरातील कंद, एक दोन फळे त्या भिक्षेकरी ब्राह्मणाला देऊ केली.

ती स्वीकारण्यास त्या ब्राह्मणाने ठाम नकार दिला. तो म्हणाला, "मला अन्नाची क्षुधा आहे. मला अन्नच हवे आहे." नामदेव म्हणाले, "आज कार्तिकी एकादशी आहे. आज उपवास. आज हेच गोड मानून घ्या. अन्नक्षुधेची तृप्ती उद्या पारण्यास होईल." भिक्षेकरी हट्टी होता. तो म्हणाला, "मला अन्नच हवे आहे. या क्षणी जर ते मला प्राप्त झाले नाही, तर माझे प्राण जातील आणि तुम्हांस ब्रह्महत्येचे पातक लागेल." नामदेव नकारार्थी मान हलवत उद्गारले, "विठ्ठल विठ्ठल !" त्याक्षणी तो ब्राह्मण कोसळला. गोणाई, राजाई बाहेर आल्या. तो प्रकार बघून घाबरून गेल्या. शेजारीपाजारी आले. आपापसात बोलू लागले. मोठा गोंधळ झाला. जो तो नामाला बोल लावीत होता. "त्या गरीब ब्राह्मण भिक्षेकऱ्याला अन्न द्यायला हवे होते. आता नामाला ब्रह्महत्येचे पातक लागलेच की नाही !" दामाशेटी दु:ख आणि चिंतेने ग्रस्त झाले. गोणाई, राजाई साऱ्यांनाच भय वाटू लागले. त्या ब्राह्मणाचे आप्त गोळा झाले. मोठा आक्रोश करत ते नामाला श्रापू लागले. त्या ब्राह्मणाचे शव आप्तांनी घरी नेले. प्रेतयात्रा निघाली. नामदेव त्या यात्रेमागून चालत गेले. चिता धगधगली. नामदेव "विठ्ठल-विठ्ठल" करत चितेजवळ आले. कोणाला कळेना काय चाललंय. बघता बघता विठ्ठलनाम घेत नामदेवांनी चितेत प्रवेश केला.

आता मात्र हलकल्लोळ माजला. चितेचा अग्नी मोठा होता. नामाने प्रवेश केलेला पाहून काही मूर्च्छित झाले. काही ओरडू लागले, तर काही घाबरून पळून गेले. नामदेव मात्र त्या भडकलेल्या ज्वाळांमध्ये "विठ्ठल, विठ्ठल पांडुरंग !" असे नेत्र मिटून नामस्मरण

करत उभे होते. ज्वाळा वर चढत होत्या. लोकांमधला आरडाओरडा वाढत होता. काहीजण किंचाळून त्याला परत येण्याविषयी सांगत होते. काहीजण घाबरून पळून गेले. ज्वाळांनी नामदेवांना वेढले. एवढ्यात तेजोमय प्रकाश निर्माण झाला. जे भानावर होते, त्यांचे डोळे त्या महातेजाने आपोआप मिटले. त्या चितेच्या अग्नीत युगंधर श्रीकृष्ण, कृपाळू मेघःश्याम, देवकीनंदन, यशोदानंदन, वसुदेवसुत, वंशीधर गोपाळ, भक्तवत्सल पांडुरंग प्रकट झाला. त्याने दृढव्रती नामाला दृढ आलिंगन दिले. त्याने नामाला चितेवरून खाली उतरवले. नामा दर्शनाने तृप्त झाला, धन्य झाला. भगवंत अंतर्धान पावले. जे लोक नामाला दूषणे देत होते, बोल लावत होते, ते थक्क झाले. इतका वेळ चितेत राहूनही नामाला कुठेही भाजले नव्हते. अग्नीने नामाला स्पर्शच केला नव्हता. लोकांनी नामाच्या चरणी लोटांगण घातले.

आपल्याला साक्षात पांडुरंगाने दर्शन दिले, हे नामाला जनाबाईला सांगायचे होते. तो त्वरेने घरी आला. घरात रडारड सुरू होती. त्यांना अर्धवट वार्ता कळली होती. गोणाई, राजाई, आऊताई तिघींचे डोळे रडून रडून लाल झाले होते. दामाशेटी अंथरुणावरच शोकमग्न अवस्थेत होते. नामाकडून सगळा वृत्तांत घरच्या मंडळींनी ऐकला. नामदेवाचा जणू आज पुनर्जन्म झाला होता. घरातल्या मंडळींना अतिशय विस्मय आणि तितकाच आनंद झाला. या सगळ्या प्रकारात जनाबाई नव्हती. नामदेवाला तिलाच आपला दर्शनानंद कथन करायचा होता. तो तिच्या खोपटाकडे वळला. खोपटाचे दार अर्धवट उघडे होते. आतले दृश्य बघून नामाचे कर जोडले गेले. मान

झुकली. आत जनाबाई मुखाने अभंग गात होती आणि स्वयं पांडुरंग ते लिहून घेत होता.

**ब्रह्मा वंदी ज्याचे पाय । त्याची यशोदा ते माय**
**साम्राज्याचा जो दानी । मागे यशोदेसी लोणी**
**क्षीरसागर ज्याचे चरणीं । त्याला पायावरतें न्हाणी**
**देव ब्रह्मांड पालकीं । त्याची टाळू हातें माखी**
**शुक सनकादिक योगी । जनी म्हणे दळूं लागी**

(संत जनाबाईकृत अभंग - २५९)

नामा आणि जना अशी ईशदर्शनाची आनंदानुभूती घेत असताना गोणाई गप्प नव्हती. तिला आपण आणि आपल्या पतीपेक्षा जास्त आपली सून आणि पुढल्या पिढीची अधिक चिंता होती. नामदेवाने कोणताही उद्योग करून प्रपंच चालवावा अशी तिची इच्छा होती. उद्योगासाठी भांडवल हवे. पंढरपुरातीलच एका सावकाराने नामदेवाच्या नावे खत लिहून २००० होन कर्ज दिले. गोणाईला अतिशय आनंद झाला. तिने ती रक्कम नामयाहाती दिली. ''घरची परिस्थिती तुला ठाऊक आहे. ह्यांचा आणि माझा आता नेम नाही. सारी जबाबदारी तुझ्यावर आहे. ही रक्कम कर्जाऊ आहे. तू यातून कोणताही तुला आवडेल, जमेल असा व्यवसाय कर आणि कर्ज फेड.'' गोणाई म्हणाली.

हाती एवढी रक्कम आल्यावर नामा जड जड झाला. ही रक्कम त्याला मोठ्या संकटाप्रमाणे भासू लागली. यातून उद्योग-व्यवसाय करावा. त्यातून नफा मिळवावा. सावकाराचे कर्ज फेडावे. उर्वरित रकमेतून प्रपंच चालवावा. मग विठ्ठलस्मरण कधी ? पैसा पुण्यसंचयात

विघ्न असतो हेच खरे. तेवढ्यात त्याला एक पुण्यमार्ग लख्ख दिसू लागला. आपण अन्नदान करावे. ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. कीर्तनाला आलेल्या काहीजणांना ही कल्पना सांगितली. त्यांनाही ती आवडली. ते कर्ज आईने पंढरपुरातून मिळवले होते. येथेच अन्नदान नको. दुसऱ्या गावी जाऊन अन्नसंतर्पण करावे. गोदावरी नदीच्या काठी राक्षसभुवन नावाचे एक क्षेत्र होते. तेथे अन्नसंतर्पणाचे व्रत करणे निश्चित झाले. गोणाई, राजाई किंवा घरातील कोणालाच नामा परगावी का निघाला आहे हे ठाऊक नव्हते. नामा व्यापार-उद्योगासाठीच निघाला असावा, असे त्यांना वाटले. आई-वडिलांना नमस्कार करून, राजाईने दिलेली भाकर बांधून घेऊन नामा घराबाहेर पडला. मंदिरात जाऊन पांडुरंगाचे दर्शन घेतले. त्याला आपला मनोदय सांगितला. पंढरपुरातील चार ज्येष्ठ ब्राह्मणांना घेऊन तो राक्षसभुवनात आला. तेथील चार प्रतिष्ठित लोक बोलावून त्यांना अन्नसंतर्पणाची कल्पना त्याने कथन केली. सारी व्यवस्था झाली. अतिशय शिस्तबद्ध रीतीने अन्नसंतर्पणाचे व्रत सुरू झाले. भोजन, दक्षिणेमुळे लोक तृप्त झाले. नामदेवाच्या या व्रताची वार्ता कर्णोपकर्णी प्रवास करत पंढरपुरच्या सावकाराच्या कानी आली. सावकार विलक्षण संतापला. त्याने दुसरा-तिसरा कोणताही विचार केला नाही. त्याने तडक राक्षसभुवन गाठले.

नामदेव गावातल्या प्रतिष्ठित मंडळींसह प्रत्येकाचे प्रेमाने स्वागत करत होता. भोजन झाल्यावर प्रत्येकाला दक्षिणा देऊन नमस्कार करत होता. सावकाराच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन भिडली. तो म्हणाला, ‘‘नामदेवा, तुझ्या आईनं तुझ्या नावे कर्जखत

केलं आहे. तू ते पैसे असे उधळतो आहेस ? उद्या मोठा कठीण प्रसंग तुझ्यासमोर उभा ठाकेल. मी तुला सोडणार नाही.'' नामा हात जोडून सावकाराला म्हणाला, ''महोदय, कर्जाची जबाबदारी सर्वस्वी माझी आहे. मी एकवेळ स्वत:ला विकेन पण आपले नुकसान होऊ देणार नाही. त्याची चिंता करू नका. अन्न हे पूर्णब्रह्म आहे. आधी जेवून घ्या.'' सावकार तणतणतच पाटावर जाऊन बसला. ताटात साग्रसंगीत पदार्थ वाढलेले होते.

सावकार एकेक घास घेऊ लागले. अन्न तर अतिशय रुचकर होते. जसे घास पोटात जातील, तसा त्यांचा क्रोध शांत होऊ लागला. एक गंभीर ध्वनी त्यांच्या अंतर्मनाशी बोलू लागला, ''बघा, किती लोक क्षुधाशांत होताहेत. जीवनाचा सगळा पसारा यासाठीच बरं ! म्हणूनच अन्नदानाचं पुण्य मोठं असतं. असा पुण्यसंचय करावा, असं कधी तुमच्या मनात आलं ? केलात कधी असा विचार ? आज नामदेवांसारखा पुण्यवान माणूस हे करतोय. अहो, याला स्वयं पांडुरंगानं जळत्या चितेमधून बाहेर काढलं असं म्हणतात. असा भगवंताच्या स्पर्शानं पावन झालेला नामा हे महान पुण्य करतोय. किती भाग्यवान आहात तुम्ही. रक्कम तुमची, पण एका पवित्र विभूतीच्या हस्ते पुण्यकर्मासाठी खर्चिली जातेय. तुमचा हा जन्म धन्य झाला.''

सावकार भोजन करून उठले. हात धुऊन ते उपरण्याला पुसले. ते नामदेवांजवळ आले. नामदेवांच्या चरणावर त्यांनी आपले मस्तक ठेवले. नामदेवांनी त्यांना उठवले. नामदेव उद्‌गारले, ''अहो, हे काय ? आपण ज्येष्ठ आहात, साहू आहात. आम्ही आपल्याला

नमस्कार करायचा.'' सावकार गहिवरून म्हणाले, ''नाही नामदेवा, आज माझे डोळे उघडले. पुण्यसंचय करण्यासाठी परोपकार करावा, असे माझ्या मनी कधी आलेच नव्हते. द्रव्याने श्रीमंत पण मनाने दरिद्रीच होतो. माझे मानसिक दारिद्र्य आज तुम्ही दूर केलेत.'' त्या सावकारांनी कनवटीचा कर्जखत लिहिलेला कागद काढला. तो टराटरा फाडून त्याचे बारीक तुकडे केले. ''आज मीच तुमचं देणं लागतो. तुम्ही माझं एक कवडीही देणं लागत नाही. आज तुम्ही जे मला दिलं आहे ते मला याच जन्मात काय पण जन्मजन्मांतरी फेडता येणार नाही. मी तुमच्या ऋणात आहे,'' असे बोलून ते सावकार निघून गेले. नामदेव ते गेल्या वाटेकडे पाहात राहिले. त्यांच्या मुखातून सहजोद्‌गार निघाले, ''विठ्ठल-विठ्ठल.''



# ८ - सखा नामयाचा

नामदेवांचे अन्नसंतर्पण व्रत यथासांग संपन्न झाले. आता राक्षसभुवनाचा निरोप घेऊन पंढरपूर गाठायचे. नामदेवांचा निरोप घेताना राक्षसभुवनाची मंडळी गहिवरून गेली. त्यांनी नामदेवांना परत कीर्तनासाठी गावात येण्याचे आग्रहाचे निमंत्रण दिले. गरीब, श्रीमंत साऱ्यांनीच नामदेवांच्या चरणी डोई ठेवली. नामदेवांचा परतीचा प्रवास सुरू झाला.

एवढ्यात कोणी पंढरपुरच्याच व्यक्तीने अर्धवट वार्ता आणली. ती वार्ता राजाईने ऐकली. आणि ती वार्ता घरी येऊन आपल्या सासू सासऱ्यांना सांगितली. वार्ता अशी, ''नामदेवांनी कर्जाची सगळी

रक्कम अन्नदान करून उधळली. आता सावकार शिपायांना घेऊन येणार. नामदेवांच्या घरावर जप्ती येणार.''

गोणाई थरथरत उभी राहिली. सावकार दारात येणार. आपली अब्रू जाणार. गरीब असलो तरी अब्रुदार होतो आपण. आता तीही जाणार. वास्तविक नामा कसा आहे, हे आपल्याला ठाऊक होते. तरी आपण असे केले. उभ्याउभ्याच ती हातवारे करू लागली. तिच्या मुखातून शब्द बाहेर पडेनात. काही क्षणात ती कोसळली. राजाई धावली. हाकारू लागली, हलवू लागली. तिने आपल्या सासूकडे नीट निरखून पाहिले. मग ती जोरात किंचाळली. दामाशेटी त्या आवाजाने तिथे आले. आपल्या पत्नीला हलवून बोलावू लागले, ''अहो, ऐकलं का, नामा येईल. मग खरं काय ते कळेल. तुम्ही असं जिवाला लावून घेऊ नका.'' बोलता बोलता त्यांचे लक्ष आपल्या पत्नीच्या मुखाकडे गेले. मग त्यांना वास्तव उमगले. त्या धक्क्याने त्यांच्या छातीतून एक जोराची कळ आली. 'पांडुरंगा', असा एकच शब्द त्यांच्या मुखातून निघाला. तेही कोसळले. नामदेवांच्या मातापित्यांनी इहलोकाची यात्रा संपवली. नामाची बहीण आऊताई, नामदेवांचे नारायण, विठ्ठल, गोविंद, महादेव असे चार पुत्र आणि लिंबाई ही कन्या सारे शोकसागरात बुडून गेले. आक्रोश ऐकून जनाबाई खोपटातून धावत आली. दृश्य पाहिले मात्र. तिचे आभाळच नाहीसे झाले. ''कान्हयाला जसे नंदयशोदा तसेच मला गोणाई दामाशेटी. आधाराचं, मायेचं पांघरूणच गेलं. प्रथमच पोरकेपणाची जाणीव झाली मला. विठ्ठला, पांडुरंगा, तू आहेस. तुझ्याच तत्त्वानं सारी भरून पावली आहेत. शरीर हे वस्त्र खरं. हे माझे नंदयशोदा

आलेही नाहीत आणि गेलेही नाहीत. पण दशरथ गेल्यावर प्रभू रामचंद्रांना दुःख झालंच ना ! मानवी देह धारण केल्यावर या सुखदुःखाच्या आवर्तनांमधून कोण सुटला ! देवा पांडुरंगा, हे दुःख पचवण्यासाठी मला शक्ती दे."

नामदेव घरी आले. घरासमोर माणसे जमलेली होती. चोखा मेळा, सावता माळी, परिसा भागवत असे सखेसोयरे ही होते. साऱ्यांच्या मुखांवर दुःखछाया पसरलेली होती. चोखोबांनी नामाला कडकडून मिठी मारली, "नामा, तुमचं आईबा वैकुंठाला गेलं." नामा धावत आत गेला. आतले दृश्य बघून "विठ्ठला," असे जोरात म्हणाला. "देवा, यांनी मी यायची वाट का पाहिली नाही ? विठ्ठला, हे सारं असं का... असं का ?" दुःखाने नामा कोसळला, आक्रोश करू लागला. संत सख्यांनी नामाचे सांत्वन केले. कीर्तनात मृत्यूच्या महाद्वारात ईश्वराचे स्वागत कसे करावे, याचे वर्णन करणारा नामा स्वतः असा घायाळ झाला होता. जन्माने शरीर मिळते. दृश्यावर नामाचे अभिधान लागून माझे नाव, माझी नाती, संबंध वाढत जातात. मृत्यूचा अंतिम बिंदू ठाऊक असून माणूस यातच गुंततो. एकदा हा देह मिळाला की सुख-दुःख-वियोग सारे आले. आपण या नियतीच्या चक्रात. घडणारी कोणतीच गोष्ट देहधारी जिवाला थांबवता येत नाही.

एकाच दिवशी काही क्षणांच्या अंतरात पति-पत्नीचा मृत्यू. विस्मयालाही नवल वाटावे अशी घटना. सारे पंढरपूरवासी जन थक्क झाले. भक्त, भाविक वारकरी जमले. 'रामकृष्ण हरी'च्या स्मरणात अंत्ययात्रा निघाली. नामाने आपल्या मातापित्यांना मंत्राग्नी

दिला. मनात तो विठ्ठलाला दुःखाने साद घालत होता. त्याला विचारत होता, ''विठ्ठल-पांडुरंगा, माझी भेट तरी घडू द्यायची होतीस, इतकी का तुला घाई होती ? देवा, खरोखर दोघांचंही छत्र माझ्या माथ्यावरून नेलंस. मी पोरका झालो.''

दिवसें दिवस नामदेव अधिक अंतर्मुख बनले. दुःखाची जागा ईशचिंतनाने घेतली. आता गोणाई-दामाशेटी नव्हते. राजाईच्या खांद्यावर प्रपंचाचे ओझे होते. ती आता थोरल्या मुलाला कोणाच्या तरी संगतीने बाजारात पाठवू लागली. धाकट्याला शिंप्याच्या हाताखाली शिकायला ठेवले होते. स्वतः थोडे शिवण टिपण करत होती. जनाबाई जमेल तेव्हा सुपलीतून धान्य आणून राजाईसमोर बळे बळे ठेवत असे. राजाई नको म्हटली तर स्वतःची शपथ घालायची. एकदा परिसा भागवतांची पत्नी कमळजा राजाईला म्हणाली, ''आमचे धनीसुद्धा देवभक्त आहेत. पण त्यांच्या पूजेत परीस नावाची एक गोल दगडासाखी वस्तू आहे. त्या वस्तूला लोखंडाची कोणतीही वस्तू लावली की त्या लोखंडी वस्तूचं सोनं होतं. त्यामुळं आमचा प्रपंच चांगला चालला आहे. मी तुम्हांला एक दिवस तो परीस आणून देईन. वापरून मला परत द्या.'' त्याप्रमाणे कमळजेने राजाईला तो परीस एक दिवस आणून दिला. राजाईने प्रयोग म्हणून लहान दोन वस्तूंचे सोने केले. त्यांच्या मोबदल्यात तिने खूप वस्तू विकत आणल्या. नेहमीप्रमाणे नामदेव त्याही दिवशी उशिराच घरी आले. मुले जेवून तृप्त होऊन बाहेर हुंदडत होती. राजाईने लगबगीने नामदेवांचे ताट तयार केले. हातपाय धुऊन, विठ्ठल स्मरण करून नामदेव जेवायला बसले. पंचपक्वान्नांनी सजलेले ताट बघून ते

थबकले, ''आज हे काय आहे ? आणि इतके पदार्थ ? कोणी दिलं हे सारं ?'' त्यांनी विचारले. ''आधीच उशीर झालाय्. आधी जेवून घ्या. मग सांगते सारं.'' राजाई म्हणाली. ''आधी कोठून आणलं किंवा कोणी दिलं ते सांग. सत्य कळल्याशिवाय माझ्या मुखात मी घास घालणार नाही,'' नामदेव निग्रहाने म्हणाले. राजाईला आपल्या पतीचा निर्धार चांगलाच ठाऊक होता. तिने सारी खरी हकीकत सांगितली. नामदेवांनी तो परीस मागितला. एकही घास न खाता ते तसेच उठले. तो परीस त्यांनी चंद्रभागेत फेकून दिला आणि ते घरी परतले.

''आता मी कमळजेला काय सांगू ? चांगल्या भावनेनं ती माझ्या मदतीला धावून आली आणि तुम्ही हे काय केलंत ?'' राजाई रडत रडत पस्तावून बोलू लागली. ''तुम्हांला नको तर नको. तिचा तिला परत देता आला असता. आता परत कोणी आपल्यावर विश्वास ठेवेल का ? त्यांच्या प्रपंचाचा आधारच तुम्ही नाहीसा केलात. काय म्हणतील परिसा भागवत !'' पक्वान्नांचे ताट तसेच राहिले. राजाई दिवसभर चिंतेत रडत राहिली. नामदेव 'विठ्ठल-विठ्ठल' करत राहिले.

दुसऱ्या दिवशी नामदेव स्नान उरकून विठ्ठलदर्शनासाठी गेले. विठ्ठलाचे दर्शन घेतल्यावर ते चंद्रभागेच्या तीरावर येऊन ध्यानाला बसले. इकडे परीस मागण्यासाठी कमळजा आली. राजाईने तिचे पाय पकडले. रडत रडत घडलेली हकीकत सांगितली. कमळजा काही न सुचून गोंधळली. ती तशीच घरी परतली. तिनेही रडत रडत सगळी घटना आपल्या पतीला सांगितली. परिसा भागवत आधी आपल्या पत्नीवर चिडले. तिला रागाने बोलले. नंतर तावातावाने ते

नामदेवांच्या घरी गेले. नामदेव घरी नव्हते. जना नुकतीच आली होती. ती म्हणाली, "ते वाळवंटात ध्यानाला बसलेत." परिसा भागवत तणतणत वाळवंटी आले. नामयाचे अतिप्रसन्न ध्यानमग्न रूप बघून त्यांचा राग मावळल्यासारखा झाला. पण काही क्षण तसेच गेल्यावर परत भानावर आले. जमेल तितका क्रोध मनी गोळा केला. नामाच्या जवळ जाऊन नामदेवांना गदगदा हलवले. नामदेवांनी नेत्र उघडले. परिसा म्हणाले, "नामदेवा, काय केलंत हे ? माझा तो लाखमोलाचा परीस या चंद्रभागेच्या पाण्यात टाकलात ! माझा प्रपंच नीट चालू नये अशी आपली इच्छा आहे काय ?" नामदेवांना ते खूप बोलले. यामुळे त्यांच्याभोवती गर्दी जमा झाली. शांतपणे त्यांचा राग पाहून नामदेव उठले. चंद्रभागेत एक डुबकी घेतली. ओंजळीतून दगडगोटे घेऊन वर आले. वेगवेगळ्या आकाराचे सातआठ तरी होते. नामदेव म्हणाले, "तुमचा परीस या पाण्यात टाकण्याचा मला खरोखर अधिकार नव्हता. पण ती चूक माझ्या हातून घडली. यातून तुमचा परीस शोधून घ्या." परिसा भागवत गोंधळून गेले. गर्दीतल्या एकाने सुया आणल्या. प्रत्येक दगडाला लावून पाहिल्या. प्रत्येक दगड परीस होता. नामदेवांनी ते सारे दगड परिसा भागवतांच्या ओंजळीत घातले. परिसांना नामदेवांचे सामर्थ्य कळले. त्यांनी ते सर्व दगड परत चंद्रभागेत फेकून दिले.

"नामदेवा, तुमचं नाही, माझं चुकलं. मीच या परिसाच्या जिवावर चैन करत होतो. मलाच आयतं सुख मिळवण्याची चटक लागली होती. आज आपण माझे डोळे उघडलेत. मी तुम्हांला रागाच्या भरात खूप बोललो. मला क्षमा करा." परिसांनी नामदेवांचे

पाय धरले. नामदेवांनी परिसांना उठवले. त्यांना दृढ आलिंगन दिले. ''परिसा भागवत, तुम्ही ब्राह्मण, भूदेव आहात. तुम्ही वेदमंत्र, ईशतत्त्व, ब्रह्म जाणता. कष्ट करूनही तुमचा प्रपंच उत्तम चालेल, यात संशय नाही. सिद्धीच्या किंवा चमत्काराच्या जोरावर मौज करणं बरं नाही.'' नामदेवांमुळे परिसा भागवतांच्यात मोठे परिवर्तन झाले.

पुढे काही दिवसांनी नामदेव अरणभेंडीला भजनदिंडीसाठी गेले होते. ओढगस्तीने का होईना राजाईचा प्रपंच चालू होता. संतांचा संसार चालवणे तशी सोपी गोष्ट नाही. त्या दिवशी घरात अगदीच काही नव्हते. धान्याचा दाणा नव्हता. चुलीत घालायला सरपणही नव्हते. जनाबाईला सांगितले, तर ती बिचारी वणवण करून करते काही सोय. पण तिला बिचारीला तरी किती त्रास द्यायचा ! पोरे अधून मधून खायला मागत होती. राजाई नुसती, ''देते हं ! करते काही'', असे म्हणत होती. दहा ठिकाणी शिवलेल्या लुगड्याच्या पदराने वाहाणारे डोळे पुसत होती. एवढ्यात दारात एक बैलगाडी आली. गाडीतून एक गृहस्थ उतरले. त्यांनी राजाईला नमस्कार केला. बसायला दहा ठिकाणी भोके पडलेले घोंगडे अंथरले. पाण्याची लोटी पुढे केली. दुसरे होते तरी काय द्यायला ! त्या गृहस्थांचा वारकऱ्यासारखा पोशाख होता. ''वहिनी, तुम्ही मला ओळखणार नाही. मी नामाचा बालमित्र. व्यवसायानिमित्त दूरगावी असतो. नामाची कीर्ती मी ऐकली आहे. खूप मोठा झालाय तो. आम्ही प्रपंची माणसं, संसाराच्या मायेत गुंतलेली. पण नामा मात्र याच्या पार आहे ! तो माझा मित्र आहे, सखा आहे याचा मला अभिमान आहे. मी आज मित्रकर्तव्य करायला आलो आहे. मंदिरात पांडुरंगाच्या दर्शनाला

गेलो होतो. नामा अरणभेंडीला भजनदिंडीसाठी सावता माळ्यांकडं गेले असल्याचं कळलं. ही होनाची थैली ठेवून जातोय मी. परत इकडं आलो की आणखीही आणून देईन मी,'' असे म्हणून ते गृहस्थ उठले आणि निघाले, गेलेसुद्धा. राजाई काही क्षण त्या थैलीकडे बघतच राहिली. नंतर भानावर येऊन ती बाहेर धावत आली. गाडी केव्हाच निघून गेली होती.

पोरेबाळे भुकेजली होती. राजाईने थैलीतील काही होन घेतले. मनसोक्त बाजारहाट केला. चारी ठाव स्वयंपाक केला. मुलांना साद घातली. सारीजणं पोटभर जेवली, तृप्त झाली. नंतर राजाईने स्वत:साठी वाढून घेतले. पहिला घास घेतला. तो तोंडातच घोळू लागला. मुलेबाळे तृप्त झालेली पाहून या अन्नपूर्णेचे पोटही भरले होते. ती स्वत:शीच हसली. चार घास खाऊन उठली. दोन दिवसांनी नामदेव आले. स्नान उरकून देवासमोर बसून नामस्मरण झाले. भोजनाची वेळ झाली होती. राजाईने त्यांना वाढले. त्यांच्या मित्राचे वर्णन केले. नामदेवांना विस्मय वाटला. ते जेवून उठले. दोन दिवसांचे जागरण होते. ते घोंगडीवर अंमळ पहुडले. पडताक्षणी त्यांना निद्रा लागली. गाढ निद्रेत त्यांना स्वप्न पडले. स्वप्नात वारकरी वेशात तो भक्तवत्सल पांडुरंग प्रसन्न हसत उभा होता. नामदेवांच्या नेत्रांमधून अश्रू गळू लागले, अधर हसू लागले. नामदेव म्हणाले, ''देवा, माझ्यावर किती ओझं लादताय ? कोण मी ? का माझ्यासाठी इतकं श्रमताय ? तुम्हांला माझ्यासाठी किती त्रास घ्यावा लागतोय ?'' पांडुरंगाने स्मितहास्य केले. तो म्हणाला, ''नामा, अरे मी मित्र, सुहृद, सखा ना तुझा ? मग दोन जिवाभावाच्या सवंगड्यांच्यात असा कोरडा

शब्दसंवाद शोभतो का ? तू माझा भक्तसखा. तुझ्या श्वासोच्छ्वासात तू मला बाळगतोस. माझ्या कीर्तीच्या गायनासाठी वणवण करतोस, मग मी तुझ्यासाठी एवढंसुद्धा करायचं नाही का ! या भक्तिप्रेमाच्या देवघेवीतूनच आपलं मैत्र नाही का वाढलं !" भगवंत अंतर्धान पावले. नामदेव जागे झाले. उठून बसले. त्यांचे हात जोडले गेले. मुखातून प्रकट झाले, "विठ्ठल-विठ्ठल !" हे होन माझ्या सख्यानेच दिले. ते माझे एकट्याचे कसे ? नामदेवांनी त्यामधूनही गोरगरिबांना दानधर्म केला. सख्याचे मन भरून पावले.



# ९ - सद्‌गुरूंची कृपा

**आषाढी कार्तिकीं विसरूं नका मज । सांगतसें गुज पांडुरंग**
**पतितपावन मी तो आहें खरा । तुमचेनि बरा दिसतसें**
**तुम्ही जातां गांवा हुरहुर माझे जिवा । भेटाल केधवां मजलागीं**
**धांवोनियां देव गळां घाली मिठी । स्फुंदस्फुंदून गोष्टी बोलतसे**
**तिहीं त्रिभुवनीं मज नाही कोणी । म्हणे चक्रपाणी नामयासी**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २१९४)

विठुरायाचे आणि नामयाचे नातेच अपूर्व. साक्षात जगताच्या पालनकर्त्याशी या नामयाचे मैत्र. दोघे एकमेकांचे सुहृद-सखे. पण यात एक गडबड मात्र झाली. नामयाला वाटले हा विठू माझ्या एकट्याचाच. तो राउळात माझ्यासाठीच कटेवर हात ठेवून विटेवरी उभा आहे. त्याच्या मनी अहंकाराचा अंकुर उगवला आणि वाढूही

लागला. विठुरायाचे आपल्या या भक्तसख्याकडे बारीक लक्ष होते.

पंढरीच्या कार्तिकी वारीचा दिवस. चंद्रभागेचा तीर वारकऱ्यांच्या गर्दीने फुलून गेला. आजचा तसा सोनियाचा दिनच म्हणावा लागेल. या भक्तपंढरीत आले होते ज्ञानेश्वर. त्यांच्यासोबत होते त्यांचे ज्येष्ठ बंधू आणि सद्गुरू निवृत्तिनाथ. सोपान, मुक्ता. सोबत गोरोबाकाकाही होते. भावार्थदीपिकेसारखा ग्रंथ लिहिणारे ज्ञानदेव. रेड्यामुखी वेद वदवणारे ज्ञानदेव. वयाने लहान पण कर्तृत्वाने महान. या बालयोग्याला नामदेवांना पाहायचे होते. नामयाची कीर्ती अशीच अवघ्या महाराष्ट्रभर. याचा घास साक्षात पांडुरंगाने आपल्या मुखी घेतला. याच्या कीर्तनी तो भक्तवत्सल रंगून जातो, आनंदाने नाचतो. या भावंडांनाही नामदेवांना भेटायचे होते.

चंद्रभागेच्या तीरी, वाळवंटी ही भेट झाली. निवृत्तिनाथांनी नामदेवांना त्यांच्या पायी डोई ठेवून नमस्कार केला. नामदेवांनी अभयकर करून आशीर्वाद दिला. मग ज्ञानदेवांनी तसाच पायी डोई ठेवून नमस्कार केला. वारकरी संप्रदायाची रीतच होती ती. मग सोपानाने, नंतर गोरोबाकाकांनीही. सर्वांना नामदेवांनी आशीर्वाद दिला. मुक्ताने मात्र नमस्कार केला नाही. निवृत्तिनाथ म्हणाले, ''मुक्ते, तुला विस्मरण झालं काय ? अगं भक्तानं भक्ताठायी ईश्वरदर्शन घ्यायचं. त्याच्या चरणी डोई ठेवायची.'' ''दादा, ईश्वरदर्शन घ्यायचं असतं. ईश्वर होऊन आशीर्वाद द्यायचा नसतो. एकमेकांमध्ये विठ्ठल पाहून प्रत्येकानं एकमेकांपायी डोई ठेवावी. दादा, या नामदेवकाकांचा घास त्या विठुमाउलीनं खाल्ला खरा. पण डोक्यातला 'मी' गेलाच नाही. खरंच, आपल्या डोक्याचा आकार देवानं विचार

करूनच मडक्यासारखा ठेवलाय,'' मुक्ता म्हणाली, ''गोरोबाकाका, तुमच्या हातातल्या थापटण्याचा उपयोग मडकं कच्चं की पक्कं हे ठरवण्यासाठीच होतो ना ?'' गोरोबाकाका हसत हसत म्हणाले, ''होय, मडकं भाजलं की आम्ही हे थापटणं त्यावर मारतो. बद्द आवाज आला की मडकं कच्चं आणि टण्ण आवाज आला की मडकं पक्कं.'' मुक्ता म्हणाली, ''मग एकदा आम्हा साऱ्यांची मडकी कच्ची का पक्की ते बघा ना.''

नामदेव या संवादाने गोंधळून गेले. त्यांच्या मनात क्रोधही आला. गोरोबांनी निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ता साऱ्यांच्या डोक्यांवर थापटणे मारले. चारही वेळा 'टण्ण' आवाज झाला. गोरोबा नामदेवांजवळ आले. त्यांना हा प्रकारच आवडला नव्हता. तरीसुद्धा गोरोबांनी त्यांच्या माथ्यावर थापटणे मारलेच. 'बद्द' आवाज झाला. नामदेवांना क्रोध अनावर झाला. ते तेथून तरातरा निघाले. सरळ त्यांनी पांडुरंगाचे राउळ गाठले. नामदेवांची काया थरथरत होती. नेत्रांमधून उष्ण अश्रू ओघळत होते.

**देव आणि नामा उभे भीमातीरा । प्रेमें येरयेरां आळविती**
**देव म्हणे नामया ऐकें गुह्य गोष्टी । संसाराची तुटी जेणें होय**
**श्री गुरूवांचुनि मुक्ति तुज नाहीं । भवनदी डोहीं नुतरसी**
**शरण गुरूसी झालिया सप्रेमें । संसाराचा श्रम उतरूनी**
**गुरू वांचुनियां कैंचा मुक्तिठाव । संसार हा वाव कैसा होय**
**म्हणुनि नामया तुंवा गुरूसि जावें शरण । तेणें भवबंधनें मुक्त होती**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २७१)

''देवा, या संतांनी माझं मडकं कच्चं ठरवलं. देवा, ही भावंडं, स्वत: गोरोबाकाका ज्ञानानं थोर खरे. पण मी... देवा, माझं काय ? देवा, आज मी स्वत:ला काय मानू ? माझं असं हसं झालं देवा, मी काय करू ?'' नामाने हात जोडून विचारले. पांडुरंग प्रसन्न हसले, ''नामा, तुझा भक्तिभाव निर्मळ खरा. तुझा परोपकार मोठा खरा, तुझं दातृत्व विशाल खरं ! तू माझ्या सगुण-साकार मूर्तीत ईश्वर पाहिलास. पण मी केवळ इथंच आहे का ? नामा, तुला सद्गुरूंची गरज आहे. सद्गुरूंचा शोध घे. त्यांचे चरण पकड. तुझं ज्ञान परिपूर्ण तेच करतील.''

**देव म्हणे नामया विसोबा खेचरासी । शरण तयासी जावें वेगीं**
**इतुकें ऐकोनि नमियेलें देवा । चालियेला तेव्हां विसोबापाशीं**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २७४)

औंढ्या नागनाथ. मराठवाड्यातील एक तीर्थक्षेत्र. बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक ज्योतिर्लिंग येथे आहे. विठ्ठलाची अनुमती घेऊन नामा या ठिकाणी आला. सद्गुरूंच्या शोधासाठी तहानभुकेची तमा न करता आला होता. विसोबा खेचरांची चौकशी करत करत महादेवाच्या मंदिरात आला. प्रचंड मंदिर. भोवतीने छोटी छोटी महादेवाचीच मंदिरे. महादेवाचे दर्शन घ्यावे म्हणून तो मंदिरात आला. तिथे एक विचित्र दृश्य त्याने पाहिले. एक ओंगळवाणा म्हातारा महादेवाच्या पिंडीवर पाय ठेवून झोपलेला होता. नामाच्या अंगाचा तिळपापड झाला. तो मोठ्या आवाजात म्हणाला, ''अहो आजोबा, तुम्ही कशावर पाय ठेवून झोपलाय ? तुम्हांला काही

कळतंय की नाही ?'' तो म्हातारा म्हणाला, ''काय करू बाबा, वयानं थकलोय मी. पायात बळ नाही, दृष्टी अधू झालेली. मला काही कळत नाही.'' ''आजोबा, तुम्ही महादेवाच्या पिंडीवर, देवावर पाय ठेवून झोपलाय !'' नामा म्हणाला. म्हातारा म्हणाला, ''असं म्हणतोस, मग देव नसेल तिथं नेऊन ठेव मला.''

नामदेवाने त्या म्हाताऱ्याला उचलून बाहेर आणले. मंडपात एका खांबाजवळ आणून झोपवले. पायाकडे बघतो तर पायाखाली महादेवाची पिंडी. परत त्याने त्याला उचलून बाहेरच्या आवारात आणून झोपवले. परत पायाखाली पिंडी. रस्त्यावरच्या एका आडव्या शिळेवर आणून झोपवले. परत पायाखाली पिंडी. नामदेव गोंधळून गेला. मटकन शिळेवर बसला. तो म्हातारा उठून बसला. त्यानं नामदेवाच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवला. ''अरे नामा, देव नाही, ईश्वर नाही, अशी जागा तुला कशी मिळणार ? तो जगत्पालक आहे. चराचर सृष्टीत तो व्यापून राहिला आहे. ज्ञानदेवादी भावंडांनी तुझ्यात विठ्ठलाला पाहिलं, पण तुला त्यांच्यात विठ्ठलाला पाहाता आलं नाही. फक्त देवळातली मूर्ती विठ्ठल. आणि तोही फक्त तुझाच. खरं ना ! अरे वेड्या, विठ्ठल तुझा परमसखा ना ? त्याला इतका का लहान करतोस ? तो विश्वव्यापी आहे.'' नामदेवांनी त्या आजोबांच्या चरणांवर लोळण घेतली. तेच विसोबा खेचर. विसोबा खेचरांनी नामदेवांना उठवले. त्यांना दृढ आलिंगन दिले.

**कृपेची साउली अखंड लाधली । खेचर माउली भेटलिया**
**आता मज भय नाहीं पैं कोणाचें । जन्म मरणाचें दु:ख गेलें**

**बंधमोक्षाची फिटली काळजी । समाधि लागली समाधीसी**
**नामा म्हणे माझें सर्वही साधन । खेचर चरण न विसंबे**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २९८)

"नामा, अरे त्या निवृत्तिनाथ, ज्ञानदेव आणि मुक्ताई या भावंडांची खरी ओळख होईपर्यंत मी केवळ विसोबा चाटी होतो. मांडे भाजण्यासाठी मुक्ताला कोणी कुंभारानं परळसुद्धा देऊ नये म्हणून प्रयत्न करत होतो. पण त्या ज्ञानमाउलीला परळ लागलंच नाही. स्वयं त्यांच्या ठायी अग्नीचं तेज होतं. त्यांनीच मला भगवद्भाव दिला. माउलीच्या मनात तुझ्यासाठी वेगळाच पवित्र विचार आहे. तुझ्या हातून फार मोठं भव्य दिव्य कार्य घडायचं आहे. ती ज्ञानमाउलीच तुला सांगेल." विसोबा म्हणाले. ऐकता ऐकता नामदेव धन्य झाले.

**सूर्याचा प्रकाश सर्वसृष्टीवरी । धन्य तो अंतरीं सर्वकाळ**
**स्वर्गादि पाताळ सर्व पूर्ण जळें । चातका न मिळे मेघाविण**
**नारायण पूर्ण सर्वभूतां ठायी । अभाग्यासी नाहीं तिहीं लोकीं**
**नामा म्हणे गुरुकृपेचें अंजन । पायाळासी धन दिसे जैसें**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ३००)

औंढ्या नागनाथाकडे जाणारे नामदेव आणि सद्गुरुकृपेने विशालदृष्टी झालेले नामदेव. आता नामदेवांना पंढरीची ओढ लागली. खरे तर तो विठ्ठल सर्वज्ञ. त्याने सारे सारे जाणले असणार. पण बालपणापासूनची गट्टी आहे ना आपली. या नात्याने मनीचा परमानंद त्याला कथन करायलाच हवा आणि सद्गुरूचा मार्ग त्यानेच दाखवला ना !

नामदेव विठ्ठलमंदिरात आले. प्रसन्न हसणारी विठुमाउली. नामदेवांनी हात जोडले. नेत्रांमधून आनंदाश्रू ओघळत होते. शब्दहीन भावाने संवाद सुरू झाला. ''देवा, तुम्हांला कळले असेलच. मला सद्गुरू भेटले.'' ''नामा, तुला मार्ग दिसला. त्यावरून जाणं तुझं काम.''

विठ्ठलाला भेटून नामदेव घरी आले. राजाई तक्रार करेल. मुले अतृप्त असतील. मागण्यांना उधाण येईल. पण घरातले वातावरण बदललेले. जनाबाईंनी दारातच नमस्कार केला. नामदेवांनी तिला प्रतिनमस्कार केला. जनाबाई समाधानाचे भरते येऊन धन्य झाली. राजाईने पतीला ओवाळले. नारा, विठा, गोंदा, महादा, लिंबा सारीजण धावत येऊन पित्याला बिलगली. विठ्ठलाच्या कृपेने सारे ठीक चालले होते. नारा, विठा छोटी-मोठी कामे करू लागले होते. नारा, विठासाठी मुली सांगून येत होत्या. एकूण वातावरणात प्रसन्नता होती. आज दशमी होती. एक वेळचे जेवण. नामदेवांनी ते घेतले. एकादशीला उपवास आणि अखंड नामस्मरण. द्वादशीला पारणे. उपवास सोडायचा. आज चंद्रभागेच्या तीरीच पाकसिद्धी केली. वरण, गोड सांजा, भाजी, भात, पोळ्या अगदी तुपाची स्वतंत्र वाटीही आणली. नैवेद्य दाखवण्यासाठी पाणी आणावे म्हणून ते नदीजवळ गेले. पात्र भरून घेऊन आले. परंतु तेवढ्यात एक कुत्रे त्या नैवेद्याच्या पत्रावळीतल्या पोळ्या तोंडात घेऊन धावू लागले. नामदेवांनी पाण्याचे पात्र खाली ठेवले आणि ते तुपाची वाटी घेऊन धावले, ''अरे थांब. नुसत्या पोळीनं तुझ्या पोटात दुखेल. त्या पोळीला तूप लाव म्हणजे ती तुला बाधणार नाही,'' नामदेव असे उद्गारले मात्र. ते कुत्रे गुप्त झाले. त्या जागी साक्षात विठ्ठल. विठ्ठलाने नामाला

आलिंगन दिले. ''नामा, आज मी संतुष्ट झालो. माझा भक्त सद्गुरूंच्या कृपेनं विशालहृदयी झाला.'' नामदेवांना आशीर्वाद देऊन विठ्ठल अंतर्धान पावला.

नामदेव पंढरपुरी आल्याची वार्ता पसरली. खूप दिवस त्यांचे रसाळ कीर्तन ऐकायला मिळाले नव्हते. आज सायंकाळी चंद्रभागेच्या वाळवंटी नामयाचे कीर्तन रंगणार होते. चोखोबा, सोयराबाई, निर्मळा, बंका, परिसा भागवत; सारे सारे जमले. जनाबाई तर होतीच. आज हातात छोट्या झांजा, चिपळ्या घेऊन नारा, विठाही होते. सारे वाळवंट भक्तभाविकांनी भरून वाहात होते. झुळझुळ वाहाणारी चंद्रभागा मंजुळ नाद करत आनंदत होती. तिलाही आज आनंदाचे भरते आले होते. तिने आज भक्त-ईश्वराची गळाभेट पाहिली होती. स्वच्छ शुभ्र धोतर, बाराबंदी, डोईवर पगडी, कपाळी टिळा, कंठात तुळशीमाळा असे नामदेव हातात एकतारी घेऊन कीर्तन करू लागले. बघता बघता सारा श्रोतृवर्ग कीर्तनात मग्न झाला. स्वत:ला विसरून गेला.

**नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावूं जगी**
**सर्व सांडूनी माझाई । वाचे विठ्ठल रखुमाई**
**परेहून परतें घर । तेथे राहूं निरंतर**
**सर्वांचें जें अधिष्ठान । तेंचि माझे रूप पूर्ण**
**अवघी सत्ता आली हातां । नामयाचा खेचरी दाता**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १३९२)



# १० - सामर्थ्य, नामयाच्या नामसंकीर्तनाचे !

**संतांची विश्रांती ज्ञानियांचें गूज । मुक्तिचें हें बीज मोक्षदानी**
**कृष्णा विष्णु हरी मुकुंद मुरारी । अच्युता नरहरी नारायणा**
**गोवर्धनधर गोपी मनोहर । भक्त करुणाकर पांडुरंगा**
**तूंचि हे सकळ आदि मध्य अंतीं । निज सुख संपत्ति सज्जनांची**
**सकळ नारायण पातक भंजन । हरि जगज्जीवन परमानंद**
**तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता । तूंचि घेता देता प्रेमसुख**
**नामदेवा ऐसें नाम त्वां ठेविलें । येणें अनुभविलें प्रेमसुख**
**विष्णुदास नामा विनवि पुरुषोत्तमा । सोडवीं भवभ्रमा पासोनियां**

(संत नामदेवांची अभंग गाथा - १९१३)

नामदेवांच्या कीर्तनरंगात स्वयं विठ्ठल परमानंदसुख अनुभवत होता. नामदेवांच्या समवेत भोवतीने दाटलेला संतमेळा भक्तीच्या अत्युच्च स्थानी गेला होता. त्यांनासुद्धा पांडुरंगाची भावभेट घडत होती. परमानंदानं चोखाबांनी नामदेवांना चरणस्पर्श करून वंदन केले. नामदेवांनी त्यांच्या चरणी डोई ठेवली. चोखोबांना दृढ आलिंगन दिले. त्यांनी चोखोबांच्या हाती एकतारी दिली. चोखोबांना मोठा हुंदकाच फुटला. ''माझ्या...माझ्या हाती ही एकतारी ! अहो, मी...मी...

**जोहार मायबाप जोहार । तुमच्या महाराचा मी महार**
**बहु भुकेला जाहलों । तुमच्या उष्ट्यासाठीं आलों**

**बहु केली आस। तुमच्या दासाचा मी दास**
**चोखा म्हणे पाटी। आणिली तुमच्या उष्ट्यासाठी**

चोखोबा भावभिजल्या स्वरात बोलू लागले, ''पांडुरंगा, आमचं मन तुझ्याशिवाय रितंच होतं. ज्ञानेश्वर महाराजांनी तुझी गीता आपल्या भाषेत केली. देवा तुझी वाणी, तुझ्या वाणीतला उपदेश आमच्यापर्यंत आला. हे नामदेव महाराज, देवा, यांनी तुझ्या मुखी घास भरवला. यांच्या कीर्तनात तुझं वर्णन. वर्णनात तुझं दर्शन. देवा, ज्या दर्शनासाठी आमची तळमळ आहे, ते दर्शन. देवा, या दर्शनानंच तुझ्या नामस्मरणातला गोडवा वाढला. नाहीतरी आमच्यापाशी ज्ञान नाही, शब्दभांडार नाही, काव्यव्युत्पत्ती नाही. आहे तो फक्त भक्तिभाव.

**आम्हां न कळे ज्ञान न कळे पुराण। वेदांचें वचन नकळे आम्हां**
**आगमाची आठी निगमाचा भेद। शास्त्रांचा संवाद न कळे आम्हां**
**योग याग तप अष्टांग साधन। न कळेची दान व्रत तप**
**चोखा म्हणे माझा भोळा भाव देवा। गाईन केशवा नाम तुझें**

त्या दिवशी चोखोबांनी कीर्तनात बहार आणली. नामदेवांनी कीर्तन सांगता केली. आपल्या हाताने चोखोबांच्या मुखात प्रसाद घातला. ''विठ्ठल-विठ्ठल'' नामदेव म्हणाले. चोखोबांनी नामदेवांकडून विठ्ठलनामाचा अनुग्रह घेतला.

संतांचे आनंदसोहळेच वेगळे. नारा, विठा, गोंदा, महादा यांची लग्नकार्ये एका-पाठोपाठ एक संपन्न झाली. राजाई, जनाबाई आणि सारे पंढरपूर या सोहळ्यात. नामदेव मात्र असून नसल्यासारखेच. असण्यात नसलेपण आणि ते नसणे याचाच अर्थ स्वयं ईश्वर असणे.

या गोष्टीची जनाबाईला मात्र पूर्ण कल्पना होती. 'चौऱ्याऐंशी लक्ष योनींमधील मानवयोनी ही सर्वांत अंतिम आणि सर्वांत श्रेष्ठ अशी. कीटक, प्राणी, पक्षी, जलचर निसर्गतत्त्वानुसारच वर्तन करणार. त्यांचे वर्तन या तत्त्वाच्या ऐल किंवा पैलही नाही. मानवाला मात्र स्वतंत्र बुद्धी, स्वतंत्र प्रज्ञा. बुद्धीच्या वापराचे पूर्ण स्वातंत्र्य. स्वातंत्र्य म्हणजेच सर्वश्रेष्ठ अशी जबाबदारी. जन्म आणि मृत्यू हातात नाही. जन्म झाल्यावर उमगण्यासही वेळ लागतो, तर मृत्यू आल्यावर फक्त निघून जायचे. आपण या जगतात नाही, हे जवळपास असणाऱ्या इतरांना कळणार. या जन्म-मृत्यूच्या मधल्या जीवनाचे आपण मालक. हा देह आत्म्याचे आवरण म्हणून आपल्याला ठराविक काळासाठी सांभाळायला दिलेला. यानंतर परत एक-दोन-तीन असे जन्ममृत्यूच्या चक्रात फिरायचे का मानवी जीवनकाळ, जो बुद्धी आणि स्वयंप्रज्ञेने युक्त आहे, तो भक्तीच्या, साधनेच्या मार्गाने व्यतीत करायचा ! यामुळे आपण जीवन्मुक्त होऊ. मोक्ष लाभेल, याचाच अर्थ भगवद्रूप होऊन जाऊ.' संतांना नेमके हेच रहस्य उमगले. तेच त्यांनी वेगवेगळे दृष्टांत देऊन जगताला सांगितले.

त्या दिवशी या पंढरपुरी वेगळाच परमानंदसोहळा संपन्न व्हायचा होता. निवृत्ती-ज्ञानदेव-सोपान-मुक्ता ही चार भावंडे या भूवैकुंठात यायची होती. पंढरपुरात ज्ञानेश्वर माउली भावंडांसह येणार ही वार्ता सर्वांना कळली. ज्यांनी रेड्यामुखी वेद वदवले, ज्यांनी दगडमातीची भिंत चालवली, ज्यांनी सच्चिदानंद बाबांना केवळ जिवंत नाही केले, तर आपण सांगितलेल्या ज्ञानेश्वरीचे लेखनिक केले. ज्ञानेश्वरी, भावार्थदीपिका ! भगवंताच्या वाणीतून उत्पन्न असे

जीवनतत्त्व. ते मातृभाषेत ! कळतील अशी उदाहरणे, मन थाऱ्यावर आणील असे दृष्टांत. इतके महान कार्य वयाच्या केवळ पंधराव्या वर्षी ! ज्ञानेश्वर माउली हाच भगवंतांचा खरा चमत्कार.

या चारही भावंडांच्या दर्शनासाठी पंचक्रोशीतील भक्तभाविक येऊ लागले. चोखोबा, सोयरा, निर्मळा, बंका मोठ्या आतुरतेने पंढरीत येऊन पोचले. या चार भावंडांची चरणकमले पंढरपुरच्या मातीत उमटली. ज्ञानदेवांचे चरण जड झाले, ते नामदेवांच्या मिठीने. निवृत्तिनाथांच्या चरणी माथा टेकून नामदेवांनी ज्ञानदेवांचे चरण घट्ट पकडले. चरणांवर डोई टेकली. ज्ञानदेवांनी मोठ्या प्रेमाने त्यांना उठवले. सोपान आणि नामदेवांनी एकमेकांना चरणस्पर्श करून नमस्कार केला. "नामदेवदादा, नमस्कार करते," मुक्ताईने नामदेवांच्या चरणावर डोई ठेवली. नामदेवांनी तिला उठवले. तिला चरणस्पर्श करून नमस्कार केला. भावनेची मोठी लाट नामदेवांच्या हृदयी उचंबळून आली. उपरण्याने डोळे पुसत ते हुंदके देऊ लागले. थोड्या कालावधीनंतर भावनावेग ओसरला. निवृत्तिनाथांनी नामदेवांकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिले. "मुक्ताईनं माझा उल्लेख नामदेवदादा केला. एका शब्दात तिनं मला पाचवं भावंड केलं. बस्स, याहून धन्यता कोणती ! मुलांचं भाग्य उजळावं म्हणून मातापिता जीवन जलार्पण करतात आणि माउलीचं कार्य ? काय बोलावं एकेका ओवीबद्दल ? किती सांगावं एकेका अभंगाबद्दल ? आठवली की मन प्रसन्न, गायली की कंठाचं माधुर्य वाढलेलं, जिव्हेचं पावित्र्य दुणावलेलं, ऐकली की तृप्तीशिवाय काही नाही अशी एकेक पंक्ती. मुक्ताई, आज खरोखर मी धन्य झालो !"

संतांनी, वारकऱ्यांनी, भक्तांनी, भाविकांनी मोठ्या श्रद्धेने या भावंडांचे दर्शन घेतले. त्यातूनच पुढे सरसावले गोरा कुंभार, गोरोबाकाका. त्यांच्याकडे पाहून नामदेवांच्या हृदयी चर्रर्र झाले. सदऱ्याच्या दोन्ही बाह्या लुळ्या पडलेल्या होत्या. दोन्ही हात थोटे. "गोरोबाकाका, हे काय ?" नामदेवांचा स्वर भिजलेला. गोरोबा, "पांडुरंग हरी !" इतकेच म्हणाले. त्यांच्या सोबत त्यांच्या दोघी पत्नी होत्या.

मातीचे घट, मातीच्या घागरी, मातीच्या वस्तू बनवाव्यात. लोकांना धान्य, वस्त्र, पैसा या मोबदल्यात द्याव्यात, आपला चरितार्थ चालवावा. गोरोबांचा हाच परंपरागत व्यवसाय. तोच व्यवसाय गोरोबांचा. पण गोरोबा विठ्ठलाचे परमभक्त. त्यांच्या हृदयीच्या गाभाऱ्यात पांडुरंगाची प्रतिष्ठापना झालेली होती.

**केशवाचें ध्यान धरूनि अंतरीं । मृत्तिकेमाझारीं नाचतसे**
**विठ्ठलाचें नाम स्मरे वेळोवेळ । नेत्रीं वाहे जळ सद्‌गदीत**
**कुलालाचे वंशीं जन्मलें शरीर । तो गोराकुंभार हरिभक्त**

एक दिवस गोरोबा चिखल तुडवीत होते. त्यांचं रांगणारं बाळ त्यांच्या पायात आलं. गोरोबा सकृतदर्शनी चिखल तुडवीत होते. पण ते मनोमन 'जय जय रामकृष्ण हरी' जप करत निजानंदात नाचत होते. रांगणारे पोर पायात आले, तुडवले गेले, चिरडून गेले, चिखल लालेलाल झालेला होता. एवढ्यात त्यांची पत्नी संती तेथे आली. ती जोरात किंचाळली. तिच्या किंचाळण्याने गोरोबा दचकून भानावर आले. आपल्या नामजपात व्यत्यय आला म्हणून ते हात उगारून आपल्या पत्नीवर धावले. "खबरदार मला हात लावाल तर. तुम्हाला तुमच्या पांडुरंगाची आण आहे !" ती तशीच चिखलाजवळ

धावली. लालेलाल चिखल उरीपोटी धरून आवाज काढून रडू लागली. मग आपल्यामुळे झालेली भयंकर गोष्ट गोरोबांच्या लक्षात आली. दुःखातिरेकाने ते "पांडुरंगा," म्हणून खाली बसले. पत्नीने, साऱ्या गावाने गोरोबांची निंदानालस्ती केली. त्यानंतर गोरोबांनी पत्नीला स्पर्श केला नाही. पांडुरंगाची आण होती.

गोरोबांना ही गोष्ट खूप लागली. ते अधिकाधिक नामस्मरणात राहू लागले. दिवस सरकतील तसे संतीचे दुःख ओसरले. पती निग्रही. आपणच आण घातली आणि ते आपल्याला स्पर्श करेनासे झाले. वंश खुंटणार या भीतीने तिने आपल्या वडिलांना बोलावून घेतले. वडिलांनी वंशवृद्धीसाठी संतीची धाकटी बहीण रामी हिचा विवाह मोठ्या आग्रहाने गोरोबांशी लावला. ते गोरोबांना म्हणाले, "तुम्हांला विठ्ठलाची आण आहे, हिलासुद्धा संतीसारखेच वागवा." संतीसारखे वागवायचे म्हणजे स्पर्श वर्ज्य. विठ्ठलाची आण आहे. दोघींनाही मोठ्या निग्रहाने गोरोबांनी स्पर्श केला नाही. दोघींच्या लक्षात ही गोष्ट आली. त्यांनी एक युक्ती योजली. एकदा एके रात्री गोरोबा गाढ निद्रेत होते. या दोघी त्यांच्या दोन बाजूला झोपल्या. त्यांचे दोन्ही हात त्यांनी आपल्या छातीवर घट्ट धरले. गोरोबांची निद्रा भंग झाली. दोन्ही पत्नींना आपल्या दोन हातांनी स्पर्श घडला. पांडुरंगाची आण मोडली. महापाप घडले. प्रायश्चित्त घ्यायला हवे. ते ताडकन उठले. फरशीच्या धारदार पात्यावर दोन्ही हात तोडून घेतले. रक्ताचे थारोळे झाले. मुखाने फक्त, "पांडुरंग, पांडुरंग" इतकेच. संती आणि रामी पश्चात्तापाने अक्षरशः घायाळ झाल्या.

आज तिघेही पंढरपुरी या भावंडांच्या दर्शनासाठी आले होते.

ज्ञानदेवांनी आणि नामदेवांनी गोरोबांना आलिंगन दिले. ज्ञानदेवांच्या नेत्री अश्रू तरारले. ''नामदेवा, आज कीर्तनसोहळा हवाच,'' थरथरत्या स्वरात ते म्हणाले. नामदेव म्हणाले, ''आज, आज कीर्तन, गोरोबाकाका, गोरोबाकाका...'' असे म्हणत ते शब्दहीन झाले. अश्रू ढाळत राहिले. थोड्या वेळानंतर स्थिरावले. एकतारी घेऊन वाळवंटी उभे राहिले. कीर्तनारंभ झाला. पण आज ते करुणरसाने व्याप्त होते.

**सकळ संतजन देखोनि नयनीं । टाळिया पिटोनि गाती नाम**

**म्हणती धन्य भक्त निधडा वैष्णव । ब्रह्मादिकां भाव न कळे याचा**

**कैसा ऋणिया केला पंढरीनाथ । आहे सदोदित याचे जवळीं**

**पूर्वीं तो प्रल्हाद श्रवणीं ऐकिला । किंवा हा देखिला संतांमधीं**

**नामा येऊनियां चरणासी लागला । हृदयीं आलिंगिला भक्तराज**

(संत नामदेवांची अभंगगाथा- २०५३)

बघता बघता नामदेवांनी आपल्या कीर्तनात सर्वांना सामावून घेतले. जोरात टाळ्या पिटत नामगजर सुरू झाला, ''विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग.'' ध्वनी वाढत गेला. नामदेवांनी हात उंचावले. सारा संतगण, सारा श्रोतृसमुदाय हात उंचावून टाळ्या वाजवत होता. टाळ्यांच्या तालावर ''विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग'' उद्घोष करू लागला. उद्घोषस्वर गगनाला जाऊन भिडला. नामदेवांसह साऱ्यांच्या नामगजराने गोरोबांचे बाहू स्फुरण पावू लागले. बघता बघता त्यांना हात फुटले. दोन्ही हात उंचावून ते टाळ्या पिटत निजानंदात गाऊ लागले, ''विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग.'' गोरोबांना हात आलेले पाहून नामदेवांना विलक्षण आनंद झाला. ते कृतज्ञतेने पांडुरंगाचा जयजयकार करू लागले. स्वत:भोवती गिरक्या मारू लागले. संती आणि रामी यांचे

आपल्या पतीकडे लक्ष गेले. त्याला परत हात आलेले पाहून त्यांना विलक्षण आनंद झाला. त्यांच्या डोळ्यांमधून आनंदाश्रू ओघळू लागले. त्याही अपार आनंदाने हात उंचावून टाळ्या वाजवू लागल्या, "विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग" गाऊ लागल्या. आपल्या पायाशी कोणी आले आहे. कोणी 'आई-आई' म्हणून हाकारते आहे, असे संतीला जाणवले. बघते तर आपले बाळ. मोठ्या मायेने तिने त्याला उचलले. त्याचे ती मुके घेऊ लागली. संती, रामीला परमानंद झाला. गोरोबांनी आपल्याला परत आलेले हात आणि संतीच्या कडेवरचा आपला बाळ पाहिला. ते आनंदाने उड्या मारू लागले. नामदेवांसकट साऱ्या संतमंडळींना विलक्षण हर्ष झाला. सारेजण नामगजर करत आनंदाने उड्या मारू लागले. "विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग" उद्घोष करू लागले.

जनाबाई मोठी धन्य होऊन सारे नेत्रात साठवत होती. अनुभूतीची ती एक उच्चतम पातळी होती. एवढ्यात त्या गर्दीच्या पार्श्वभूमीवर तिने पाहिले साक्षात विठ्ठलाला, साक्षात पांडुरंगाला ! साक्षात भगवंताच्या नेत्रांमध्ये आनंदाश्रू होते. भक्तांच्या आनंदसौख्याने तो मोहरून गेला होता. जनाबाई भावविवश होऊन गाऊ लागली.

**विठो माझा लेंकुरवाळा । संगें गोपाळांचा मेळा**
**निवृत्ती हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी**
**पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर**
**गोरा कुंभार मांडिवरी । चोखा जीवा बरोबरी**
**बंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी**
**जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा**



# ११ - तीर्थयात्रा प्रस्थान

**अनंत तीर्थांचें माहेर । अनंत रूपांचें हें सार**
**अनंतीं अनंत अपार । तो हा कटीं कर विटे उभा**
**धन्य धन्य पांडुरंग । सकळ दोषां होय भंग**
**पूर्वज उद्धरती सांग । पंढरपूर देखिलिया**
**निरा भिवरां पडतां दृष्टी । स्नान करितां शुद्ध सृष्टि**
**अंतीं वास त्या वैकुंठीं । ऐसें परमेष्टि बोलिला**
**तेथें एक शीत दिधल्या अन्न । कोटी कुळांचें होय उद्धरण**
**कोटि याग केले पूर्ण । ऐसें महिमान ये तीर्थांचें**
**नामा म्हणे धन्य जन्म । जे धरिती पंढरीचा नेम**
**तयां अंतीं पुरुषोत्तम । जीवें भावें न विसंबे**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २१३६)

नामदेवांचे रसाळ कीर्तन. प्रसंग कथन करीत तेव्हा चक्षूंसमोर चित्रच निर्माण होई. गायन किती गोड, वाटावे गंधर्वच अवतरले. भक्तिभावाने ओथंबलेले नामसंकीर्तन. ज्ञानदेवांच्या मनी नामदेवांचे कीर्तन. त्या कीर्तनाच्या आठवात ज्ञानदेव निमग्न झाले होते. त्या निमग्नावस्थेतच त्यांना एक कल्पना सुचली. आपण नामदेवांसमवेत तीर्थयात्रेस जावे. भरतवर्षाचा सारा समाज गुलाम झालेला. किती लोकांना या गुलामगिरीची जाणीव होती ? किती लोकांना स्वातंत्र्य हा शब्द ठाऊक होता ? जो तो स्वार्थमग्न होता. मी, माझा प्रपंच, माझी जात. मी श्रेष्ठ की हा श्रेष्ठ ! ज्याने त्याने आपापल्या जाती घट्ट धरल्या होत्या. तितकाच घट्ट परजातीबद्दलचा द्वेषही पकडून ठेवला

होता. परकीय सत्ताधीशांना हा भेदभाव हवाच होता. असे भेदभाव हे त्यांचे बलस्थान होते. जात, दारिद्र्य, कर्मकांडांचा अतिरेक, ईश्वराच्या नावावर चाललेला बाजार. तीर्थयात्रेच्या निमित्ताने समाज, माणूस यांचे निरीक्षण करता येईल. त्यातूनच भागवत धर्माच्या प्रसारकार्याची दिशा निश्चित करता येईल. नामदेवांसारखा सच्चा आणि निस्सीम भागवत मिळायचा नाही. यात्रानुभूतीमधून मुळातच असलेली विशाल वृत्ती अधिक प्रगल्भ होईल. माझा किती नेम ! मला अल्प काळातच परतायचे आहे. या भागवतधर्माची राखण नामदेवांनाच करायची आहे. तो अधिकाधिक उत्कर्षाप्रत नामदेवांनीच न्यायचा आहे.

ज्ञानदेवांनी आपले ज्येष्ठ बंधू आणि सद्गुरू निवृत्तिनाथांना आपल्या मनातील योजना कथन केली. निवृत्तिनाथांना संतोष झाला. त्यांनी अनुमती दिली. ज्ञानदेव नामदेवांना भेटले. ''नामदेवा, आपण दोघं तीर्थयात्रेला जावं असं वाटतयं.'' नामदेवांना आश्चर्य वाटले, ''तीर्थयात्रा, हे भूवैकुंठ सोडून ?'' मंदसे स्मित करत ज्ञानदेव म्हणाले, ''नामदेवा, हे भूवैकुंठ आहे खरं. हे तीर्थांचं तीर्थ आहे, हेही खरं. पण आपली भरतभूमी ही साक्षात देवभूमी आहे. या मातीत जन्म घेतलेल्या प्राचीन काळातल्या महान लोकांनी नगर, राज्य, देश यांच्या सीमा 'वसुधैव कुटुम्बकम्' या श्रेष्ठतम भावनेनं आखल्याच नाहीत. सारा मानव एक मानला. 'हे विश्वचि माझे घर' मानले. परंतु आज धर्मभेद, जातिभेद यांनी समाज पोखरून निघाला आहे. कर्मकांडांमुळं खऱ्या धर्माची ओळखच विसरून गेले आहेत. अज्ञान, दारिद्र्य यांनी लोक गांजून गेले आहेत. तीर्थस्थळी माणूस पाहायला

मिळतो आणि देवदर्शन तर होतेच होते. नामदेवा, आपल्या संगतीनं हा योग साधावा असं मनात आहे.''

ज्ञानदेव आणि नामदेव दोघेही मंदिराच्या गाभाऱ्यात आले. दोघांनीही त्या भक्तवत्सलाला भक्तिभावाने नमस्कार केला. दोघांच्या अंतर्मनात मंगल ध्वनी निनादला, ''इच्छित कार्य माझंच आहे. सारीच माझी लेकरं. अज्ञानाच्या अंधारात चाचपडत आहेत. नामदेवा, या माझ्या ज्ञानमाउलीबरोबर तीर्थयात्रेची अनुभूती घे. मला ठाऊक आहे, तू माझ्या अनुमतीशिवाय काही करायचा नाहीस. माझी या तीर्थाटनाला पूर्ण अनुमती आहे. सखा, मित्र आहेस माझा. तुझ्या परतीची मी चातकासारखी प्रतीक्षा करेन. ज्ञानमाउली, वयानं सान खरा पण ज्ञानविशाल आहेस तू. नामासंगे तू आहेस, मला चिंता नाही. ज्ञाना, अरे तू आणि मी फरक तो कोणता ? तू आहेस, तिथं मी आहेच.'' पांडुरंगाची अनुमती मिळाली. दोघेही मंदिराबाहेर आले.

नामदेवांनी राजाईला आपल्या तीर्थयात्रेचा बेत निश्चित झाल्याचे सांगितले. ''तीर्थयात्रा ? आणि माझं काय ? अहो, तुम्हांला पोरं, सुना सगळा प्रपंच आहे. तो चालवायला काही करा असं नाही म्हणत मी. पण आता... आता घर सोडून तीर्थयात्रा !'' राजाई दुःखावेगाने बोलू लागली. ''माणसं तीर्थयात्रेला जातात आणि... आणि परतत नाहीत हो. माझ्या मनात सारं सारं अशुभ गोळा होतंय हो. कुठं सप्त्याला गेला, कुठं कीर्तनाला गेला; जास्तीत जास्त पंधरा दिवसांत परत येता. अजून तुमचं वयही तसं तीर्थयात्रेला जायचा

विचार करावा असं नाही.'' नामदेव तिचे बोलणे मधेच तोडत म्हणाले, ''मी ज्ञानदेवांच्या बरोबर तीर्थयात्रेला निघालो आहे. ते तर माझ्याहून वयानं लहानच आहेत की.'' राजाई म्हणाली, ''त्यांना प्रपंच नाही हो. बायका-पोरं-बाळं नाहीत.'' ''चार भावंडं आहेत ती,'' नामदेव धन्य होऊन अंतर्मुख झाले, ''विधात्याचं पवित्र स्वप्न म्हणजे निवृत्ती-ज्ञानदेव-सोपान-मुक्ता. त्यांचे मातापिता कोण तर विठ्ठल-रुक्मिणी. कोणत्या वयात किती सोसावं याची परिसीमा म्हणजे ही चार भावंडं. त्या दिवशी मुक्ता मला नामदेवदादा म्हणाली. मोठं पारितोषिक लाभावं असं मला वाटलं. माझा ज्ञानदेवांना शब्द गेलाय. पांडुरंगानंही रुकार दिलाय. आता मला अडवू नकोस. माझा जाण्याचा पक्का निर्धार आहे.''

राजाई त्या दिवशी दुपारी जेवली नाही. सुना आग्रह करत होत्या, पण ती ऐकत नव्हती. शेवटी जनाबाई आली. तिनं राजाईला जवळ घेतलं. तिच्या कुशीत शिरून राजाई रडरड रडली. जनाबाई तिला प्रेमानं थोपटत राहिली. राजाई शांत झाल्यावर जनाबाई तिला समजून सांगू लागली, ''आपलं भाग्य मोठं. आपल्याला या मोठ्या लोकांची संगत लाभली. तुझा पती, माझा भाऊ आणि गुरू नामदेव. यांचा मोठेपणा किती ? बालपणी यांच्या हातून साक्षात पांडुरंगानं घास घेतला. यांच्यासाठी त्या विठ्ठलानं काय काय नाही केलं ? नामदेवांचा प्रपंच मोठा. अगं ज्ञानदेवांना प्रपंच नाही, पण त्यांच्याएवढा मोठा प्रपंच कोणाचाच नाही. ही देवकार्य करणारी माणसंच गं ! यांचा प्रपंच तो पांडुरंग करतो. तुलाही अनुभव आहे. एकदोनवेळा

नाही, अनेकवेळा आहे. नवऱ्याच्या प्रेमापायी मान्य करत नाहीस इतकंच ! आज नामदेव माउलींबरोबर तीर्थयात्रेला जाताहेत. अडवू नकोस त्यांना. आनंदानं निरोप दे. माझ्या पांडुरंगानंही अनुमती दिलीय आणि काय म्हणाला ठाऊक आहे ? तो म्हणाला, 'सखा, मित्र आहेस माझा. तुझ्या परतीची मी चातकासारखी प्रतीक्षा करेन.' स्वयं भगवंतानं ज्याची वाट बघावी, अशा महान भक्ताची तू पत्नी आहेस. पूर्वजन्मीच्या पुण्याईनंच लाभावं असं परमभाग्य आहे तुझं. नामदेवांच्या हातून फार मोठं कार्य व्हायचं आहे, त्यांना असं अडवू नकोस. मी सांगते तुला, ते नक्की परत येतील.'' जनाबाईनं राजाईला त्या दिवशी स्वतःच्या हाताने घास भरवून जेवू घातले.

त्या दिवशी रात्रीची जेवणे झाली. नामदेव पांडुरंगाचे नामस्मरण करत येरझाऱ्या घालत होते. पोरे, सुना सारी झोपली होती. एवढ्यात नामदेवांचे पाय अडले. नामदेव बघतात तर राजाईने आपले पाय घट्ट पकडलेले. नामदेवांनी तिला उठवले, जवळ घेऊन थोपटू लागले. राजाई मुसमुसत बोलू लागली, ''चुकलं आमचं. तुम्ही जा तीर्थयात्रेला. पण परत मात्र नक्की यायचं हं ! मी बायको आहे तुमची. माझा अधिकार त्या पांडुरंगापेक्षा जास्तीचा आहे. लक्षात ठेवा, बायको म्हणजे अर्धांगिनी. तुम्ही खूप खूप मोठे आहात. तसं मला ठाऊक होतंच, पण जनाबाईच सांगत होत्या. तुमच्या हातून फार मोठं देवकार्य होणार आहे. तुम्हांला मी अडवणार नाही, पण तुम्ही नक्की परत यायचं या अटीवर !'' इतकं बोलून राजाईने परत अश्रूंना वाट मोकळी करून दिली. नामदेव तिला थोपटत होते. मुखाने म्हणत होते, ''विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग!''

प्रस्थान-दिन उगवला. दोघांना निरोप देण्यासाठी सारे पंढरपूर गोळा झाले. गोड पदार्थ, वस्त्रे, रुका-पैसा अशा गोष्टी आपल्या वतीने अर्पण करण्यासाठी लोकांनी आणल्या होत्या. पण या दोघांनी अतिशय नम्रपणे नकार दिला. ''तो तर जगत्पालक. वेगवेगळ्या रूपात आपण त्याला वेगवेगळ्या स्थानी स्थापन करतो. त्याच्या निवासानं ते स्थान तीर्थ बनतं. साऱ्या जगताचा नियंता तो. त्याला रुक्या-अडक्याची वस्तूंची काय गरज ? त्याला हवा फक्त आपला भक्तिभाव. तो आम्ही निश्चितपणे त्याला कथन करू.'' नामदेवांनी घरच्या मंडळींचा निरोप घेतला. मुले, सुना साऱ्यांनाच विरहदुःख होते. राजाईच्या जवळ सतत जनाबाई होती. पतीच्या माघारी तिचा तो मोठा आधार होता. ज्ञानदेव-नामदेव लोकसागरातून मार्ग काढत विठ्ठलाच्या राउळी आले. विठुरायाच्या चरणी नामदेवांनी डोई ठेवली. ''नामा, मी तुझी प्रतीक्षा करतोय हं !'' पांडुरंग म्हणाला. ज्ञानदेवांनी पांडुरंगचरणी डोई ठेवली. ''ज्ञानदेवा, माझ्या नामयाला सांभाळ हं.'' विठुरायाचा आवाज कातरला. ज्ञानदेवांनी त्या भक्तवत्सलाला अभिवचन दिले. नंतर त्यांनी भक्तराज पुंडलिकाचे दर्शन घेतले. अफाट जमलेल्या जनसमुदायाला विनम्र अभिवादन करून दोघे निघाले. विठुनामाचा उद्घोष होत होता. दोघेही भीमेच्या पैलपार झाले. साऱ्या जनसागराच्या बघता बघता दृष्टीच्या कक्षेतून पार झाले.

# १२ - तीर्थयात्रा

संत नामदेव आणि संत ज्ञानदेव दोघांनी चंद्रभागा ओलांडली. ते दोघे अरणभेंडीला आले. तेथे त्यांची भेट झाली सावता माळ्याशी.

**कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी**
**लसुण मिरची कोथिंबिरी । अवघा झाला माझा हरी**
**मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी**
**सावता म्हणे केला मळा । विठ्ठल पायीं गोंवला गळा**

नंतर ते बार्शीला गेले. तिथे ते जोगा परमानंदांना भेटले. आंबेजोगाईला आद्यकवी मुकुंदराजांची समाधी आहे. तिचे त्यांनी दर्शन घेतले. विसोबा खेचर, नामदेवांचे सद्गुरु. त्यांचे आशीर्वाद घेऊन पुढे तीर्थयात्रेला निघावे असा मनोदय नामदेवांनी प्रकट केला. ज्ञानदेवांनी त्याला अतीव आनंदाने रुकार दिला. दोघेही औंढ्या नागनाथाला आले. शिवरात्रीचा मुहूर्त होता. विसोबांना शोधायला वेळ लागला नाही. नामदेवांनी विसोबांच्या चरणावर मस्तक ठेवले. ज्ञानदेवांनी विसोबांच्या पायावर डोई ठेवली. विसोबांना ज्ञानदेवांची योग्यता चांगलीच ठाऊक होती. त्यांनीही ज्ञानमाउलीच्या चरणी माथा टेकवला. विसोबा म्हणाले, "ज्ञानदेवा, दोघंही मोठ्या शुभमुहूर्तावर या तीर्थक्षेत्री आला आहात. आज इथं माझ्या नामयाचं कीर्तन व्हावं अशी माझी इच्छा आहे. अज्ञ लोक हरी आणि हर यांच्यात भेद करतात. माणसामाणसांमधला भेद अपवित्र. मग देवादेवांमधल्या भेदभावाचं पाप किती ? या हराच्या मंदिरी नामदेवाच्या रसाळ कीर्तनानं हरिहर एक होऊ देत. लोकांना नवदृष्टी लाभू दे." ज्ञानदेव

म्हणाले, "विसोबा ! आपण माझ्या मनातलं बोललात. नामदेवा, तुमच्या कीर्तनात साक्षात पांडुरंग नाचतो. ते भाग्य शिवशंकराला कधी लाभणार ? आजच्या मंगलदिनी आपलं कीर्तन होऊ दे." नामदेव म्हणाले, "माझ्या मुखातून त्या भक्तवत्सलाचं नाम येतं ही त्याची आणि सद्गुरूंची कृपा. आपणा दोघांचीही आज्ञा आहे. करेन मी कीर्तनसेवा." कीर्तनाची सिद्धता झाली. शिवमंदिराच्या सभामंडपात शिवासमोर श्रोते गर्दी करून दाटीने बसले. नामदेवांनी महादेवाला नमस्कार केला. सद्गुरूंना वंदन करून आपल्या अद्वैतकीर्तनाला आरंभ केला.

**भजन करा हरिहरा । नारायण शिवशंकरा**
**माझें बोलणें अवधारा । भेद न करा दोघांचा**
**तुम्हां सांगेन सत्य वृत्तांत । पाहें पां तेथींचा दृष्टांत**
**नारायणें सेविलें अमृत । झाला श्वेत महादेव**
**शंभूने गिळिलें हलाहला । म्हणोनि विष्णु झाला निळा**
**देखत देखत आंधळा । झणीं होसी गव्हारा**
**लक्ष्मीरूपें आपण हरू । देवें वरिला शारंगधरू**
**गरुडरूपे महेश्वरू । वाहन झाला विष्णूचें**
**शक्तिरूपे शारंगपाणी । नारायण झाला भवानी**
**शारंगधर नंदी होऊनि । सन्मुखासनीं बैसला**
**एक तो वेगळा नाहीं । दृष्टांत तूं आगमीं पाहीं**
**नामा म्हणे एक केशव ध्यायीं । हरिहर पाहीं ज्याचे अवतार**

(संत नामदेवांच्या अभंगगाथा -१९१)

कीर्तनाला रंग भरला. श्रोते तल्लीन झाले. एवढ्यात सोवळे नेसलेले पुजारी अभिषेकाच्या साहित्यासह आले. ''अभिषेकाचा मुहूर्त जवळ आलाय. वेळ तर जवळजवळ झालीयच. बंद करा ती टाळकुटी. चालते व्हा इथून. इथं थांबायचं असेल तर तोंड बंद करून अभिषेक बघा. आज शिवरात्र आहे. कळत नाही तुम्हांला ?'' त्यांच्या या बोलण्याने नामदेवांचा चेहरा पडला, गोरामोरा झाला. कीर्तन अर्ध्यावर सोडणे बरे नाही. ज्ञानदेव म्हणाले, ''नामदेवा, देव सर्वत्र आहे. त्यांना अभिषेक करायचा आहे. त्यांचंही ठीकच आहे. आपण मंदिराच्या मागं जाऊ. ज्यांना अभिषेकानुभूती घ्यायची असेल ते इथंच थांबतील. ज्यांना आपल्या कीर्तनाची आनंदानुभूती घ्यायची असेल, ते आपल्या समवेत येतील. मंदिराच्या मागल्या बाजूला कीर्तन सुरू झाले. बहुतांशी लोक कीर्तन ऐकायला मंदिरामागे आले. पुन्हा कीर्तनाला रंग आला.

इकडे मुहूर्तावर अभिषेक झाला. अभिषेकाला नेहमी प्रचंड गर्दी होते. पण आज मात्र हाताच्या बोटावर मोजावेत इतकेच लोक. एकदा सहज जाऊन बघूया तरी कसे काय कीर्तन चालले आहे, म्हणून ते मागे आले. कीर्तन अंतिम टप्प्यात आले होते. आणि पुजाऱ्यांनी पाहिले तर ती देवळाची पाठभित उरलीच नव्हती. शंकराने सारे मंदिरच फिरवले होते. शंभू महादेव कीर्तनात रंगून गेले होते.पुजाऱ्यांना धक्का बसला. त्यांना नामदेवांचे कीर्तनसामर्थ्य कळले. कीर्तन संपल्यावर ते त्यांच्या पायावर लोळण घेऊन म्हणाले, ''महाराज आम्हांला क्षमा करा. आमचा घोर अपराध झाला.'' नामदेवांनी त्यांना मोठ्या प्रेमाने उठवले. संतांच्या अंतरी क्रोध नसतोच.

नागनाथाहून ते वेरूळ मार्गे पंचवटीत आले. नर्मदा पार करून नामी, मही, साबरमती ओलांडली. मग ते कृष्णभूमीत, द्वारकेत आले. गुजरातमधून सौराष्ट्रला आले. 'जय श्रीदत्त' च्या घोषात गिरनार पर्वताचा चढउतार करून नंतर अंबाजीचा डोंगर चढून त्यांनी आदिशक्तीचे दर्शन घेतले. नंतर ते पवित्रतम प्रयाग क्षेत्री आले. तीर्थयात्रा करत करत ते राजस्थानात आले. सिद्धपूर, अबूपर्वत, एकलिंगजी करत ते वाळवंटी प्रदेशात आले. दुपारची वेळ. सूर्य माथ्यावर होता. वाळू विलक्षण तापली होती. नामदेव, ज्ञानदेव दोन्ही संतांना तहान लागली. दोघांचेही कंठ कोरडे पडले. तृषेने व्याकूळ झाले. दोघेही पाण्याचा शोध घेत चालू लागले. पण कोठे पाणी दिसेना. एके ठिकाणी मात्र एक विहीर होती. ती तरी कशी ? अतिशय चिंचोळी, खूप खोल, उतरायला पायऱ्या नाहीत. अगदी तळाशी पाणी चमकताना दिसत होते. ज्ञानदेव आणि नामदेव दोघांनीही एकमेकांकडे पाहिले. दोघेही तृषार्त होते. ज्ञानदेवांनी अणिमा सिद्धीचा वापर केला. देह सूक्ष्म केला. विहिरीच्या तळाशी जाऊन त्यांनी जल प्राशन केले. तृषा शमवून ते परत वर आले. ''नामदेवा, जल अतिशय मधुर आणि शीतल आहे. आपणही तृषार्त आहात. योगसामर्थ्यानं तृषा शमवून या.'' आणखी काही वाटसरू तेथे गोळा झाले. त्यांनाही तहान लागली होती. तेही त्या चिंचोळ्या खोल विहिरीत वाकून वाकून बघत होते. पाण्याचे दर्शन होत होते, पण पाणी मात्र पिता येत नव्हते.

नामदेवांनी नेत्र मिटले. हातातल्या चिपळीच्या तालावर विठ्ठलाला साद घालायला आरंभ केला. ''विठ्ठल विठ्ठल, पांडुरंग !'' हळूहळू

उद्घोषाचा वेग वाढला. जमलेला समूह नामदेवांच्या मागोमाग ''विठ्ठल विठ्ठल, पांडुरंग !'' असा उद्घोष करू लागले. सारा परिसर या नादाने भरून गेला. विहिरीतल्या जलाला या नादब्रह्मात सहभागी व्हावेसे वाटले. जल त्याचसाठी वरवर येऊ लागले. बघता बघता विहीर भरून गेली. नामदेवांच्या नेत्रांमधून अश्रू आले. ''विठ्ठला, पांडुरंगा, हे जल नाही, तुझेच कृपातीर्थ आहे !'' नामदेवांनी विठ्ठलस्मरण करत ओंजळीने ते तीर्थ प्राशन केले. लोकांनीही त्या शीतल आणि मधुर जलाने आपली तहान भागवली. नामदेवांचा आनंदाने जयजयकार केला. दोन्ही संतांचा चरणस्पर्श करून लोक आपल्या मार्गाने गेले.

ज्ञानदेवांच्या नेत्रांमधून आनंदाश्रू आले. ''नामदेवा, आपण खरे भक्त-भागवत आहात. केवळ आपल्या तृषेचा विचार न करता जनसामान्यांच्या तृषेचा विचार केलात. मला आपली क्षमा मागितली पाहिजे. मी आपल्याहून वयाने सान आहे, तरीही मी आपली परीक्षा घेतली. सिद्धिमोह हा अहंकाराचे मूळ असतो. प्राप्तसिद्धी स्वार्थपूर्तीचे माध्यम बनण्याची शक्यता असते. म्हणून सिद्धिप्रयोग करून मी आपली परीक्षा, कसोटी घेतली. मला क्षमा करा. मला तो अधिकार नाही. पण नामदेवा, माझ्या आपल्याकडून असलेल्या अपेक्षेनं मी ते केलं. खरंच मला क्षमा करा.'' ज्ञानदेवांनी नामदेवांना दृढ आलिंगन दिले. ''नामदेवा, समाज हा असा. गरीब दीन झालेला. धर्म स्वार्थी माणसांनी विळखा घालून ठेवलेला. भेदभावांनी तडे गेलेला समाज. खरा धर्म सांगणं हेच भागवत धर्माचं कर्तव्य. त्यासाठी समाजाविषयी जिव्हाळा असणं आवश्यक. तो जिव्हाळा आपल्या ठायी आहे.

खरोखर नामदेवा, आजचा आनंद अलौकिक आहे आणि स्मरणीय आहे.'' ज्ञानदेवांच्या स्तुतीने नामदेव भारावून गेले. त्यांचे हात आपल्या हाती घेऊन म्हणाले, ''माझा पांडुरंग, माझे सद्गुरू आणि आपण साक्षात ज्ञानमाउली. असा त्रिगुणात्मक ठेवा माझ्याजवळ असताना माझं कौतुक ते कितीसं ! पण माउली, आपण माझ्याकडूनच्या अपेक्षेबद्दल काही म्हणालात, ती सांगाल तर आनंद वाटेल.'' ज्ञानदेव म्हणाले, ''नाही नामदेवा, तो विषय आज नको. आज मला आपण जी समाधानानुभूती दिलीत, त्यातच राहू दे.'' आज ती विहीर 'नामदेवजीका कुआँ' या नावाने तीर्थ बनली आहे.

नंतर दोघेही अजमेर म्हणजेच पुष्कर क्षेत्री आले. पुष्कर हा सरोवरांचा, कमळांच्या ताटव्यांचा रमणीय प्रदेश. तिथे त्यांनी ब्रह्मदेव, गायत्री, सावित्री यांचे दर्शन घेतले. नंतर हरिद्वार, भरतवर्षाचा मुकुटमणी हिमाचल. दोन्ही संतांनी भरल्या डोळ्यांनी त्या पर्वतराजाचे दर्शन घेतले. भव्यतेच्या दिव्य दर्शनाने ते तृप्त झाले. नंतर ते गंगा नदीकडे आले. भारतातील पूजनीय सरिता. दोन्ही संत गंगेच्या स्नानाने धन्य झाले. नंतर ते पंजाबला गेले. 'पंच-आप' म्हणजे पाच नद्या. पाच नद्यांनी युक्त तो पंजाब. वितस्ता (झेलम), इरावती (चिनाब), चंद्रभागा (रावी), शतद्रू (सतलज) आणि विपाशा (बियास) अशा पाच नद्या. पंजाब करून संतद्वय काशीला आले. काशी हे तीर्थांचे तीर्थ मानले जाते. काशीयात्रा घडणे हे अनेकांचे जीवनध्येय असे. प्रत्यक्ष काशीला जाता आले नाही तर 'काशीस जावे नित्य वदावे,' असे म्हणत असत. सावता माळी, गोरा कुंभार, जोगा परमानंद, परिसा भागवत, विसोबा खेचर, सेना महाराज असे

सारे संतमंडळ या संतद्वयाची प्रतीक्षा करत होते. गंगा-स्नान आणि काशी-विश्वेश्वराचे दर्शन सर्व संतमंडळींनी घेतले. भारद्वाज मुनींचा आश्रम पाहून सारे संत मणिकर्णिकेच्या घाटावर गेले. त्या घाटावर मुद्गलाचार्य एक मोठा यज्ञ करत होते. यज्ञाची तयारी पूर्ण झालेली होती. पण वैदिक, शास्त्री, पुराणिक यांच्यात अग्रपूजेचा मान कोणाचा यावरून तंटा निर्माण झाला. शेवटी यावरील उपाय म्हणून एका हत्तिणीच्या सोंडेत पुष्पमाला देण्यात आली. ती पुष्पमाला ती ज्याच्या गळ्यात घालेल त्याने अग्रपूजा करावी असे निश्चित झाले. सारे वैदिक, शास्त्री, पुराणिक एका ओळीत उभे राहिले. काय घडते याची उत्सुकता प्रत्येकाला होती. हा प्रसंग बघत संतमंडळही उभे होते. साऱ्यांच्या पुढून ती हत्तीण फिरली. फिरत फिरत ती संतमंडळापुढे आली. तिने आपल्या सोंडेतील पुष्पमाला ज्ञानदेवांच्या कंठात घातली. सारे संतमंडळ 'पुंडलीक वर दे हरी विठ्ठल, जय जय रामकृष्ण हरी' म्हणत आनंदाने नाचू लागले.

सारे संतमंडळ भ्रमण करत हस्तिनापुरात आले. याच ठिकाणी महाभारत घडले. कौरव-पांडव येथेच वावरले, भांडले. युगंधर श्रीकृष्णाचा पदस्पर्श, उपदेश करणारा त्याचा ध्वनी. भक्तांवर प्रेम करणाऱ्या या भक्तवत्सलाला पुंडलिकाने भक्तीच्या सामर्थ्याने पंढरपुरी आणले. नामदेवांना आपल्या पांडुरंगाचे स्मरण झाले. एका वेगळ्याच ओढीने सारे संत पंढरीला आले. पांडुरंगाचे दर्शन घेतले. पांडुरंगाला विलक्षण आनंद झाला. त्याच्या नेत्रांमधून आनंदाश्रू ओघळले. नामदेवांनी तीर्थयात्रेचे मावंदे केले.

**सद्‌गदित कंठ वोसंडला नयनीं । घातली लोळणी चरणांवरी**
**शिणलों पंढरिराया पाहें कृपादृष्टी । थोर झालों हिंपुटी तुजवीण**
**उदंडा तीर्थांची ऐकों जाय प्रौढी । चित्त माझें ओढी चंद्रभागे**
**कटितटी जेणें कर नाहीं ठेविलें । न देखे पाउलें विटेवरी**
**त्यातें म्हणतां देव माझें लाजे मन । ते कष्ट दारुण कवणा सांगूं**
**कुंचे गरुडटके न देखे पताका । त्या देवाची शंका वाटे थोर**
**ज्याचे गांवीं नाहीं वैष्णवांचा मेळू । न देखे सुकाळु हरिकथेचा**
**हें न देखे तेथें खंती वाटे जीवी । ते वेळीं आठवी रूप तुझें**
**इष्ट मित्र बंधु तूं कुळदेवता । नामा म्हणे आवडता प्राण माझा**

मावंदे झाल्यानंतर खऱ्या अर्थाने तीर्थयात्रेची सांगता झाली. सारी संतमंडळी परत पांडुरंगाचे दर्शन घेऊन आपापल्या गावी परतली.



# १३ - हृद्‌गत. दोन संतांचे !

**एकांति बैसोनि करी गुजगोष्टी । धरोनि हनुवटी बुझावित**
**नको बा मानूं संसाराचा शीण । तुज एक खूण सांगतों मी**
**होणार तें होय न होणार ते न होय । सुखदुःख पाहे कर्माधिन**
**देव म्हणे चोख्या नको मानूं शीण । तुज माझी आण भक्तराया**

- संत चोखा मेळा

संत चोखा मेळा, चोखोबाकाका अतिशय कष्टाळू आणि

प्रामाणिक. कष्ट करताना मुखी सदैव विठ्ठल नाम. महाद्वाराबाहेरच्या शिळेवर बसून त्या रात्री विठुरायाला साद घालत होते. त्यांच्या मुखातून अभंगांमागून अभंग प्रकट होत होते.

**पाहतां पाहतां वेधियला जीव । सुखाचा सुख सिंधु पंढरीराव**
**माझा हा मीपणा हरपला जाण । कळल्या आगम निगमाच्या खुणा**
**भवसागराचा दाता । विठ्ठल विठ्ठल वाचे म्हणतां**
**उभा राहुनि महाद्वारीं । चोखा मेळा दंडवत करी.**

- संत चोखा मेळा

चोखोबाकाकांच्या भक्तिप्रेमाने पांडुरंगाला भरते आले. पांडुरंग मंदिराबाहेर आले. ते आणि चोखोबा अत्यानंदानं गाऊ लागले, नाचू लागले. त्या आनंदाच्या भरात विठुरायांनी आपल्या कंठातील रत्नहार चोखोबांच्या कंठी घातला. मध्यरात्र उलटून पहाटसमय आला. भगवंत मंदिरी परतले. चोखोबा त्याच चिदानंदी राहून पायरीवर मस्तक ठेवून झोपले. सूर्य उगवू लागला. पक्षी किलबिलाट करू लागले. पूजासामान घेऊन पुजारी आले. चोखोबांना जाग आली. त्यांनी मंदिरासमोरचे आवार झाडून काढायला सुरुवात केली. तुळशीमाळा पुष्पहार उतरवताना विठ्ठलाच्या कंठी रत्नहार नाही, हे पुजाऱ्यांच्या ध्यानी आले. त्यांना धक्काच बसला. ते पूजा सोडून धावत बाहेर आले. त्यांचे लक्ष आवार झाडणाऱ्या चोखोबांकडे गेले. त्यांच्या गळ्यात काही लोंबत होते. त्यांनी ते निरखून पाहिले. बघतात तर विठ्ठलाच्या कंठातील रत्नहार. "चोर, चोर," पुजारी आरडाओरडा करू लागले. चोखोबांवर विठ्ठलाच्या कंठातील रत्नहार

चोरल्याचा आळ आला. लोक जमा झाले. चोखोबांना मारू लागले. त्यांना शिव्याशाप देऊ लागले. चोखोबा आपण निर्दोष असल्याचे सांगू लागले. त्या विठुरायानेच मोठ्या आनंदाने आपल्या कंठी हा हार घातल्याचे सांगू लागले. पण त्यांचे कोणी ऐकूनच घेतले नाही. अखेर ते त्या पांडुरंगाचा धावा करू लागले.

**धांव घाली विठु आतां चालूं नको मंद । बडवे मज मारिती ऐसा कांही तरी अपराध**
**विठोबाचा हार तुझे कंठी कैसा आला । शिव्या देती महारा म्हणती देव बाटविला**
**अहोजी महाराज तुमचे द्वारींचा कुतरा । नकाजी मोकलू चक्रपाणी जिमेदारा**
**जोडूनिया कर चोखा विनवितो देवा । बोलिलों उत्तरें परि राग नसावा**

- संत चोखा मेळा

चोखोबांच्या गळ्यातील रत्नहार परत पांडुरंगाच्या कंठी जाऊन स्थिरावला. पुजारी चोखोबांच्या गळ्यातील रत्नहार काढून घ्यायला गेले तर रत्नहारच नाही. ''रत्नहार कुठं आहे ? कुठं दडवलास तो ?'' पुजारी कडाडले. ''माझ्या पांडुरंगानं माझी विनवणी ऐकली. तो हार त्यांच्याच कंठी आहे.'' पुजारी धावत गाभाऱ्यात गेले. बघतात तो भगवंतांच्या कंठात रत्नहार जसाच्या तसा होता. पुजाऱ्यांना धक्काच बसला. त्यांनी मारणाऱ्यांना आवरले. या झाडलोट करणाऱ्या साफसफाई करणाऱ्या अंत्यजाच्या ठायी बरीच शक्ती आहे हे त्यांना जाणवले. चोखोबांच्या बाह्यरूपावरून सारेजण त्यांना जाणण्याचा प्रयत्न करत होते. पण त्यांच्या अंतरातील निर्मळ भक्तिभाव जाणण्याची कुवत त्यांच्यात नव्हती.

**ऊंस डोंगा परी रस नोहे डोंगा । काय भुललासी वरलीया रंगा**

**कमान डोंगी परी तीर नोहे डोंगा । काय भुललासी वरलीया रंगा**
**नदी डोंगी परी जळ नोहे डोंगें । काय भुललासी वरलीया रंगें**
**चोखा डोंगा परी भाव नोहे डोंगा । काय भुललासी वरलीया रंगा**

- संत चोखा मेळा

तीर्थयात्रा करून नामदेव पंढरपुरी परतले. राजाईला आनंदाचे भरते आले होते. मुलेही त्यांच्या भोवती घुटमळत होती. चोखोबांना भेटायला नामदेव गेले. चोखोबांच्या चेहऱ्यावरची दुःखछाया त्यांनी पाहिली. नामदेवांनी चोखोबांना चरणस्पर्श करून नमस्कार केला. चोखोबांनीही त्यांच्या चरणी डोई ठेवली. त्यांचे डोळे गळत होते. नामदेवांनी प्रश्नार्थक मुद्रेने सोयराबाई, कर्ममेळ्याकडे पाहिले. दोघांनीही घडला प्रकार सांगितला. थरथरत्या स्वरात चोखोबा म्हणाले, ''तो विठ्ठल, आमचा देव, आमच्या मनातून जाता जात नाही. माझ्या देवाला माझा विटाळ होत नाही आणि यांना... नामदेवा, मी तुमच्याइतका ज्ञानी नाही. पण त्या पांडुरंगाच्या भक्तीनं हा चोखा भरून पावला आहे.''

**आम्हां न कळे ज्ञान न कळे पुराण । वेदांचे वचन न कळे आम्हा**
**आगमाची आठी निगमाचा भेद । शास्त्रांचा संवाद न कळे आम्हा**
**योग याग तप अष्टांग साधन । न कळेची दान व्रत तप**
**चोखा म्हणे माझा भोळा भाव देवा । गाईन केशवा नाम तुझें**

-संत चोखा मेळा

यावर नामदेव म्हणाले, ''चोखोबा, नुसते मंत्र, नुसती स्तोत्रं म्हणून किंवा पुराणांची पारायणं करून मनात भक्ती नसेल तर काय

उपयोग ! तो भक्तवत्सल फक्त भक्तिभाव मागतो. तो भाव तुमच्यापाशी भरभरून आहे. आपला सखा तो पांडुरंग असताना या लोकनिंदेची काय पत्रास ! यांच्यावर क्रोध करावा, यांना शिव्या देऊन आपण आपलं तोंड घाण करावं इतकीही यांची पात्रता नाही. अशा वेळी माउलींचा आठव करावा. फटके खाल्ले तरी हूं की चूं नाही. तुम्हांला अडाणी म्हणणारे महाअडाणी आणि तुमच्या स्पर्शानं ज्यांना विटाळ होत असेल ना, त्यांच्या नशिबात तर तुमचा पुण्यस्पर्श लिहिलेलाच नाही. आज तुम्ही, सोयराबाई, निर्मळा, परिसा, नरहरी, बंका, सावता, सेना, गोरोबाकाका पांडुरंगाच्या आणि सद्गुरूंच्या कृपेनं किती सत्संग आहे. यांच्यापुढं त्या निंदकांची काय किंमत. ती मुक्ताई तर मला नामादादा म्हणाली. चोखोबा आपण सगळे त्या कुटुंबातले झालो. अहो, गीता ही साक्षात भगवंतांची वाणी. त्यावरचंच निरूपण ज्ञानदेवांनी आपल्या मराठीत, मायबोलीत आणलं. त्यांचं आपलं नातं निर्माण झालं. कोण विचारतो या निंदकांना ! ज्ञानेश्वर माउलींचं मन मोठं. इतके हाल होऊनही, इतका छळ होऊनही ती करुणामूर्ती म्हणते,

**'जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रति वाढो**
**भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचे'**

बस्स ! चोखोबा, माउली हाच आपला आदर्श. हाच आपल्या मनाचा आधार.''

दिवस, मास पुढे सरकत होते. नामदेवांचे नित्यकर्म सुरू होते. क्षणभरही विठ्ठलाचा विसर नाही. त्याच्याशी त्यांचे मैत्र होते. तोच त्यांचा सखा होता. त्या सख्याशी त्यांचा सुखसंवाद नित्यनेमाने सुरू

होता. कार्तिक शुद्ध एकादशीला एक ब्राह्मण नामदेवांना येऊन भेटला. ''नामदेवा, निवृत्तिनाथांचा सांगावा आहे. तुम्ही आळंदीला यावं म्हणून निरोप आहे. ज्ञानेश्वरही तुमची प्रतीक्षा करताहेत. लवकर आळंदीला निघा.'' नामदेव म्हणाले, ''हो, नाथांचं, माउलीचं बोलावणं आहे. तुम्ही आत या. गुळपाणी तरी घ्या,'' नामदेवांचे वाक्य पूर्ण होण्याआधी तो ब्राह्मण गेला, अंतर्धान पावला. एकादशी दिवशीच नामदेव निघाले, त्या ब्राह्मणाविषयी विचार करतच निघाले. कार्तिकीला विसोबा खेचरही आले होते. जाताना विठ्ठलाचे दर्शन घेतले. नंतर सद्गुरूंच्या दर्शनाला गेले. त्यांनी त्यांना आशीर्वाद दिले. नामदेवांनी त्यांना त्या अनोळखी ब्राह्मणाच्या निरोपाविषयी आणि अंतर्धान होण्याविषयी सांगितले. विसोबा हसत म्हणाले, ''असा रे कसा तू भोळाभाबडा ! तो तर साक्षात विठ्ठल, पांडुरंग.'' नामदेवांचे हात अभावितपणे जोडले गेले, ''माझा विठ्ठल, माझा पांडुरंग. देवा किती... किती श्रम घेशील रे माझ्यासाठी !'' नामदेव आळंदीला येऊन पोचले. निवृत्तिनाथ आणि ज्ञानदेवांना आश्चर्य वाटले. ज्ञानदेव म्हणाले, ''आम्हां दोघांनाही तुमची आठवण आली होती. तुम्हांला भेटावं असं वाटलं होतं, पण अजून आम्ही कोणाला पाठवलं नव्हतं.'' ''माउली, त्या भक्तवत्सलानं आपलं काम केलं. तोच त्या ब्राह्मणरूपात आला होता,'' नामदेव म्हणाले. सर्वांनी एकमेकांच्या चरणी डोई ठेवली. मनोमन त्या विठ्ठलाचा आठव केला.

संध्यासमय. सोनेरी किरण धरणीमातेवर पसरत ज्ञानसविता ओसरत होता. त्याच्या साक्षीने दोन संत संवादात निमग्न होते.

नामदेवांचे हात आपल्या हाती घेत ज्ञानदेव म्हणाले, ''नामदेवा, आमची निजधामी परतायची वेळ झाली.'' नामदेवांच्या हृदयाचा थरकाप उडाला. मन भयभीत झाले. शब्द जागच्या जागी थिजून गेले. डोळ्यांमधून अश्रू झरू लागले. थोडावेळ ते ज्ञानदेवांकडे बघत राहिले. जणू काही नेत्रांमधून अंतरात ते त्यांना साठवत होते. त्यांच्याकडे पाहून ज्ञानदेव म्हणाले, ''नामदेवा, आपण ज्ञानी आहात. ईश्वराची आपणावर कृपा आहे. बालपणापासून आपलं ईश्वराशी मैत्र आहे. त्यानं आपला नैवेद्य मोठ्या प्रेमानं खाल्ला. आपल्या इच्छेनुसार आपला आणि त्याचा संवाद होतो. इतकी ईश्वराशी मैत्री असताना येण्या-जाण्याची काय कथा. गीतामाता सांगते की, शरीररूपी वस्त्र बदलतं पण आत्मा चिरंजीव असतो. अर्थात मी आपल्याला शास्त्रार्थ काय सांगावा ? आपण माझ्यापेक्षा ज्येष्ठ आहात.''

''ज्ञानदेवा, आपण माझ्याहून वयानं सान खरे. पण ज्ञानाचा कृपावंत मेघ म्हणतात ना, तो आपण आहात. वयाची ती बाब काय, ज्ञानाचा सागर आपल्या ठायी आहे. आपणच गेलात तर संतमेळ्याचं काय ? वारकरी संप्रदायाचं काय ? आज कुठं माणसाला माणसाची किंमत पुन्हा उमगू लागलीय. देवा, अजून खूप चालायचंय. हा तर केवळ आरंभ आहे. आणि अशा वेळी इतक्या लहान वयात....'' नामदेवांना भरून आले. शांतवृत्तीने ज्ञानदेव म्हणाले, ''विठूमाउलीचं बोलावणं आलं आहे. मातापित्यांच्या परम त्यागानं आणि सद्गुरूंच्या कृपाप्रसादानं माझ्या हातून जे घडलं ते त्यांचंच श्रेय आहे. आणि हा भक्तिसंप्रदाय म्हणाल, तर तो वाढवण्यास आपण समर्थ आहात. आपल्यावर सारा भार सोपवून आम्ही निश्चिंत मनानं जातो

आहोत.'' नामदेवांनी आपल्या दोन्ही हातांनी ज्ञानदेवांचे मुख धरले. नेत्र अश्रूंनी भरले. ते म्हणाले, ''देवा, आपलं वय ते काय! आता कुठं समाज तुम्हांला आपलं मानू लागलाय. किती सोसलंय तुम्ही भावंडांनी ! एकेक प्रसंग आठवला की अंगावर काटा येतो. वाटतं, इतकं सोसवलं तरी कसं तुम्हांला ? मन भरून येतं.'' ज्ञानदेवांनी प्रेमभराने नामदेवांच्या स्कंधांवर आपले दोन्ही हात ठेवले, ''नामदेवा, यात समाजाचा तो काय दोष ? आपल्या समजुतीनुसार तो वागला. अज्ञानी माणसानं प्रमाद केला तर त्याला दूषण देऊ नये. त्याचं अज्ञान दूर करावं. आपल्या कृतीनंच तसं करावं.'' नामदेव थक्क झाले. ''माउली, लहान मुलांशी दुष्टपणानं वागले ते. क्रूर वृत्तीनं वागले. खरोखर अज्ञान असणं आणि खल प्रवृत्ती असून ती अहंकारानं पोसणं, यात अंतर नाही काय ?'' नामदेवांच्या या प्रश्नावर ज्ञानदेव स्मित करत म्हणाले, ''आहे, यात निश्चित अंतर आहे. अज्ञानाचा अंधकार ज्ञानप्रकाशानं दूर करता येतो. खलप्रवृत्तीचं म्हणाल तर तो अज्ञानाचा कडेलोट असतो. या खलप्रवृत्तीनं वागले तर त्याचे परिणाम काय, याविषयी अज्ञान असल्यामुळं तो क्रूरपणानं वागतो. अहंकारामुळं त्याची संयमित विचार ऐकण्याची मानसिक तयारीही नसते. त्यावर उपाय एकच. त्यांच्याकडं दया-बुद्धीनं बघावं. त्यांची खलवृत्ती जावी, त्यांना सत्याची जाणीव व्हावी; अशी त्या सर्वेश्वरचरणी प्रार्थना करावी. प्रार्थना जितकी अंतरातून तितकं अधिक यश. आम्हा भावंडांच्या सोसण्याचं म्हणाल तर आईनं, तातांनी किती सोसलं ! शेवटी आम्हा मुलांसाठीच त्या दोघांनी...'' ज्ञानदेवांना हुंदका फुटला.

काही क्षण गेल्यावर ज्ञानदेवांनी भावनावेग आवरला. वृत्ती शांत करून ते नामदेवांना म्हणाले, ''नामदेवा, कर्म, योग, ज्ञान आणि भक्ती या ईश्वरप्राप्तीच्या चार पायऱ्या आहेत. ज्ञान म्हणजे भक्तिमार्गावरचा महत्त्वाचा टप्पा. प्रेमानं, ईश्वराशी तादात्म्य होणं हीच खरी भक्ती. त्यासाठी ईशतत्त्वाशी अनन्य होणं आवश्यक आहे. सगुण साकार अशा ईशमूर्तीची पूजा हीही एक साधना आहे. नामस्मरण हा या भवसागरातून तरून जाण्याचा सोपा मार्ग आहे. नेमकं आपल्याला लोकांना हेच सांगायचं आहे. तीर्थयात्रा, व्रतवैकल्यं, मंत्रतंत्र हा आचार ठीक आहे. पण नामस्मरण सर्वश्रेष्ठ आहे. देवाला काही द्यावं, नवस करावा आणि आपलं मागणं पूर्ण करून घ्यावं, इतका का देव लहान आहे ! त्यापेक्षा सदाचरण ठेवावं. गरीब-श्रीमंत, उच्च-नीच, जात-पात असा भेदभाव करू नये. मनी करुणा बाळगावी. तृषार्ताला पाणी द्यावं, भुकेल्याला अन्नाचा घास द्यावा, भयग्रस्ताला अभय द्यावं, संकटग्रस्ताला मदतीचा हात द्यावा, निराश्रितास आश्रय द्यावा, याहून देवकार्य ते कोणतं ? जातिभेदाचा कलंक आपल्या समाजाला लागला आहे. नामदेवा, तो आपल्याला पुसून टाकायचा आहे. आपण सारी पांडुरंगाची लेकरं आहोत, हा पांडुरंग भक्तवत्सल आहे. तो मातापित्यांची सेवा करणाऱ्या पुंडलिकाकडं मोठ्या कौतुकानं पाहात उभा आहे. हाच खरा भक्तांचा आधार आहे. याच्यावर निष्ठा ठेवून कर्म केलं तर जीवन सफल होईल. नामदेवा, माझं काही चुकत असेल तर सांगा. आपण वयानं आणि साधनेनं माझ्याहून श्रेष्ठ, ज्येष्ठ आहात.'' ज्ञानदेवांची अमृतवाणी ऐकून नामदेव गहिवरले. ते म्हणाले, ''ज्ञानदेवा, साक्षात पांडुरंगच

तुमच्या मुखातून बोलतो आहे. बोला माउली, बोला.'' ज्ञानदेव म्हणाले, ''जो स्वत:ला या विठूमाउलीचा भक्त, वारकरी म्हणवून घेईल, त्यानं सत्य बोलावं, परस्त्रीला रुक्मिणीमाता मानावं, जातिभेद करू नये, प्राणिहत्या करू नये, निरामिष आहार करावा, अत्यंत प्रामाणिकपणानं ईश्वरसाक्षीनं आपली संसारकर्म आचरावीत. आणि--आणि रामकृष्णहरी, रामकृष्णहरीचा जप सतत करून संपूर्ण जीवनच ईश्वरनिष्ठ करावं. हेच लोकांमध्ये रुजवायचं आहे. व्यक्तीचं आणि व्यक्तीकडून समाजाचं चारित्र्य मंगल करायचं आहे. आज आमची याहून दुसरी कोणतीही इच्छा नाही. नामदेवा ! तुमच्याशी त्या विठुरायाची बालपणापासून गट्टी आहे. त्याची शपथ, तुम्ही हेच कार्य आमच्यानंतर करायचं आहे. द्या, आम्हांला वचन द्या. आपण वचन दिलंत की, आमचा समाधिमार्ग मोकळा झाला.''

''नाही--नाही ज्ञानदेवा-माउली, तुम्ही म्हणाला ते कार्य करतो. तुम्ही म्हणाल ती सेवा करतो. पण समाधी ? इतक्या लहान वयात समाधी...'' नामदेव तोंड ओंजळीत घेऊन रडू लागले. ज्ञानदेवांनी नामदेवांना जवळ घेतले, ''नामदेवा, तुमच्यासारख्या परमार्थाच्या जाणकारांनी तरी हे दु:ख बाळगू नये. हा देह म्हणजे मी आहे का ? आता तुम्हांला परत सारतत्त्व सांगायला हवं का ?'' नामदेव शांत झाले. ''ज्ञानदेवा, दिलं, वचन दिलं. माउली, आज हा माझ्या जीवनातला सर्वश्रेष्ठ क्षण आहे. आजपर्यंत जी ईशसेवा माझ्या हातून घडली, तिचं फल आज मला प्राप्त झालं. या ईश्वरी कार्यासाठी आपण माझी निवड केलीत. आज मी धन्य झालो !



# १४ - संजीवन समाधी सोहळा

चारही भावंडे आळंदीला आली. सिद्धबेटावरची कुटी पाहून चौघांनाही भरून आले. गोठ्यातली बंधनमुक्त गाय आनंदानं हंबरू लागली. घराच्या दर्शनाने भावंडांचे डोळे वाहू लागले. सोपान म्हणे, ''ज्ञानादादा, आता इथे आनंदाने राहूया ना ?'' ज्ञानदेवांनी त्यातला गर्भितार्थ जाणून म्हटले, ''सोपान देव, अहो, आपण दु:खात होतोच कुठे ? मातापिता, विठ्ठल आणि सद्गुरुकृपेने आपण आनंदातच होतो. बरे, पैठणच्या धर्मतीर्थावरील अधिकाऱ्यांनी तर आपण हा लौकिक प्रपंच करण्यासाठी, त्यातील सुख उपभोगण्यासाठी आलोच नाही आहोत, असे शुद्धिपत्र देताना सांगितले. ते खरेच आहे.'' उत्तराने सोपान गप्प झाला. पण मुक्ता म्हणाली, ''शब्दांनी तृप्त करतोस खरा तू. पण ज्ञानादादा, तुझ्या जाण्याची कल्पनाच सहन होत नाही. तू समाधी घेणार ? काय सांगू तुला ! तात-माय डोळ्यांसमोर येतात. ते आपल्यासाठी गेले. आणि तू....'' मुक्ता ओंजळीत मुख घेऊन स्फुंदू लागली. ज्ञानदेव म्हणाले, ''मुक्ते, अगं तू ज्ञानी ना ! भावार्थदीपिकेच्या समाप्तीनंतर हत्तीवरून मिरवणुकीच्या प्रसंगी तू शाश्वत-अशाश्वताचा अचूक सिद्धांत सांगितलास. त्याचेच तुला विस्मरण झाले ना !'' मुक्ताने तोंडावरचा हात काढला झंपरच्या बाहीने डोळे पुसले, ''दादा, मला... मला मन आहे. तू... तू समाधी घेणार... तू दिसणार नाहीस....'' मुक्ताने ज्ञानदेवांच्या दोन्ही गालांवरून हात फिरवले. सर्वज्ञ असूनही ज्ञानदेवांच्या नेत्रांमध्ये अश्रूंनी दाटी केली. सोपान निवृत्तीला म्हणाला, ''निवृत्तिदादा, तू गुरू ना याचा ? याला समाधी घेऊ नको, म्हणून आज्ञा कर. समाधी

घ्यायची नाही म्हणून सांग.'' सोपानदेवाने निवृत्तीचा हात हाती घेतला, ''सांग ना रे !'' तेवीस, एकवीस, एकोणीस, सतरा अशी वये यांची. निवृत्तीनं सोपानाच्या हातून आपला हात सोडवून घेतला. कुटीच्या आत जाऊन बाळकृष्णासमोर जाऊन बसला. हात जोडून म्हणाला, ''युगंधरा, सांग, मी काय करू ? विधीच्या न्यायापुढं मी कोण !'' डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. सारे शरीर थरथरू लागले.

**इवलेंसें रोप लावियेलें द्वारीं । तयाचा वेलु गेला गगनावेरी**
**मोगरा फुलला मोगरा फुलला । फुलें वेचिता भार कळियांसि आला**
**मनाचिये गुंती गुंफियेला शेला । बाप रखुमादेवीवरीं विट्ठलीं अर्पिला**

एक इवलेसे आत्मज्ञानाचे बीज. ज्ञानदेवांच्या सकस मनोभूमीत निवृत्तिनाथांनी पेरले. त्यातून एक तेजोमय अंकुर बाहेर आला. पाहता-पाहता वेल वाढली. गगनापर्यंत उंच उंच वाढली. त्या वेलाला केवळ भूलोकातीलच नव्हे तर त्रैलोक्यातील जीवमात्रांच्या कल्याणासाठी तत्त्वसिद्धांताची असंख्य फुले लागली. मोगराच तो ! सुंदर आणि सुगंधित ! फुले खुडावीत, त्यातील गंधाने स्वर्गलोकीचा आनंद अनुभवावा. त्या वेलीने पुन्हा कलिका धारण कराव्यात. नित्य चिंतन-मननाचा धागा. त्या धाग्यात ती फुले गुंफावीत आणि तो अतीव मंगल, मनोहर हार ज्ञानदेवांनी विठ्ठल-रखुमाई चरणी अर्पण करावा.

सूर्योदय झाला. निवृत्ती-सोपान-ज्ञानदेव तिघेही इंद्रायणीत मंगलस्नान करून आले. मुक्ताचेही स्नान झाले होते. तिने पाठीवर केस मोकळे सोडले होते. मोगऱ्याची फुले ती खुडत होती. तिघांना आलेले तिने पाहिले. ''ज्ञानादादा, इकडे ये.'' ती म्हणाली. ज्ञानदेव

जवळ गेले. ''दादा, ही वेल लहान होती. तू मोठ्या प्रेमाने तिला कुरवाळायचास. तुझ्या हस्तस्पर्शाची तिलाही सवय झालेली असेल ना !'' ज्ञानदेव त्या फुललेल्या मोगरीकडे बघत राहिले. एकदम उद्गारले, ''मुक्ताबाई, हे सौंदर्य, हा अप्रतिम गंध, सारीच त्या विधात्याची किमया. आपण फक्त आनंद घ्यावा. आनंदाने त्यांना स्पर्शावे. ज्याच्या कृपेने यांचे अस्तित्व, त्यालाच समर्पित करावे. यातला रंगगंधाचा आनंद चिरंतन. बाकी जडशीळ देहच. मग तो मानवी देह असो वा परमपरोपकारी वृक्षलता असोत.''

आपले सद्गुरू निवृत्तिनाथ यांच्या अनुमतीने ज्ञानेश्वर माउलीने आपला समाधीचा दिन सुनिश्चित केला. 'कार्तिक वद्य त्रयोदशी, शके १२१८.' वाऱ्यासारखी ही तिथी महाराष्ट्रातल्या विठ्ठलभक्तांच्या कानी गेली. मग काय, प्रत्येक पाय आळंदीला निघाला. जाताना मुखाने 'श्री ज्ञानेश्वर महाराज की जय,' आणि 'जय जय रामकृष्ण हरी' असा उद्घोष. साऱ्या नियोजनासाठी नामदेव आले. नामयाची दासी जनी आली. संत नामदेवांच्या लेकरांनाही ज्ञानेश्वर माउलीचे दर्शन घ्यायचे होते. विठा, महादा, गोंदा अशी तिघेही आली. विसोबा खेचर आले, चांगदेव आले, अरणभेंडीहून सावता माळी आला, भक्तीचे सोने घेऊन नरहरी सोनार आला, मंगळवेढ्याहून 'जोहार मायबाप' करत चोखोबाकाका आले, त्यांची पत्नी सोयराबाईही आली, तेरेगावाहून टाळ वाजवत गोरा कुंभार आला, मृदुंगावर ताल धरीत बंका महाराज आले. आळंदीला संतश्रेष्ठांची मांदियाळी झाली. गगनात ब्रह्मा-विष्णू-महेश या ईशत्रयीने आळंदीतल्या भक्तीच्या

संतदीपांचे दर्शन घेतले. देवांनाही 'अलं ददाति', तृप्त होईपर्यंत या आळंदीने भरभरून दिले. देवांचे मन भरून पावले.

इंद्रायणीचा तीर. सिद्धेश्वरासमोर. साक्षीला सोन्याचा सळसळता पिंपळ. समाधिस्थानही निश्चित झाले. जन्म आळंदीत, बालपण आणि मातापित्यांचा सहवास आळंदीतच. दशमीचा दिवस. नगर प्रदक्षिणा झाली. नंतर संतश्रेष्ठांनी हरिकीर्तन केले. एकादशीला उपवास आणि द्वादशीला पारणे. पारण्यादिवशी भोजनाची असंख्य पात्रे, पंचपक्वान्नांनी भरलेली पात्रे. माता-भगिनींनी मोठ्या प्रेमाने रांधलेले विविध पदार्थ. प्रत्येक अन्नपूर्णेला वाटायचे, आपण रांधलेल्यातील एक घास तरी या बालयोग्याने खावा. आता हे रुपडं दिसणार नाही. गगनांतरी सरस्वतीने अन्नपूर्णेला आनंदाने मिठी मारली. डोळ्यांतले मोत्यांसारखे चकाकणारे अश्रूच जणू बोलत होते. शेवटी ओष्ठांनी शब्द प्रकट केले, "सखे अन्नपूर्णे, मी तुझ्या ऋणात आहे. जन्मजन्मांतरी हे ऋण फिटणार नाही." अन्नपूर्णा सरस्वतीला चरणस्पर्श करत म्हणाली, "माते-सरस्वती, अगं, खरी तर मीच तुझ्या ऋणात आहे. केवढी मोठी सेवा तू माझ्या हातून करवून घेतलीस ! या योग्यांच्या माउलीची सेवा. खरंच गं, मीच तुझ्या ऋणात आहे."

कार्तिक वद्य त्रयोदशी. इंद्रायणी नदी. ज्ञानेश्वर माउली इंद्रायणीच्या जलामध्ये तिला विनम्र अभिवादन करून उतरले. या सरितेचा अखेरचा जलस्पर्श. ज्ञानदेवांचे हृदय उचंबळले. तळहाताने त्या वाहत्या जलाला स्पर्श करून त्यांनी अनेकवार वंदन केले. खळखळ वाहणाऱ्या इंद्रायणीचा प्रवाह संथ झाला. त्या वत्सल मातेने संपूर्ण

जलप्रवाहाच्या अश्रूंनी ज्ञानदेवांना निरोप दिला. ज्ञानदेवांबरोबर सारे संतमंडळ नदीत उतरले होते. त्यांचे वाहणारे अश्रू त्या प्रवाहात मिसळून जात होते. संतांनी ज्ञानदेवांच्या देहाला उटणे लावले. निवृत्ती, सोपान, मुक्ता स्नान उरकून हे ज्ञानाचे कौतुक पाहात होते. संतांनी शुभ्र वस्त्रांनी ज्ञानाचा देह पुसला. चंदनाची उटी लावली, तुलसीमाला, पुष्पमाला घातल्या. ज्ञानदेव, ज्येष्ठ बंधू आणि सद्गुरू निवृत्तिनाथांसमोर आले. त्यांचे सारे शरीर दु:खाने थरथरत होते. ज्ञानदेवांनी त्यांच्या पायी डोई ठेवली. टाहो फोडून निवृत्तिनाथ म्हणाले,

**बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट, ओघ वारा-वाटा मुरडताती।**
**बांधल्या पेंडीचा सुटलासे आळा, तृण रानोमाळ पांगलेसे।**
**हरिणीवीण खोपी पडियेली ओस, दशदिशा पाडस भ्रमताती।**
**मायबापे आम्हां त्यागियले जेव्हा, ऐसे संकट तेव्हा झाले नाही।**

ज्ञानदेव सोपानाकडे वळले. सोपान ज्ञानाला घट्ट मिठी मारून म्हणू लागले, "ज्ञाना, तू जाऊ नको. मी तुला सोडणार नाही." मोठ्या कष्टाने ज्ञानदेवांनी ती मिठी सोडवून घेतली. आता ते मुक्तासमोर आले. "मुक्ते, माते, येतो मी." इतकेच ते हात जोडून म्हणाले. मुक्ता दु:खातिरेकाने कोसळली. ज्ञानदेवांनी प्रत्येक संताच्या चरणावर डोई ठेवली. साऱ्या संतांचे ओठ थरथरत होते, नेत्र बोलत होते. दु:खावेगाने शब्दच मुके झाले होते. आता ज्ञानदेव आले नामदेवांसमोर. त्यांच्या चरणी डोई ठेवली. नामदेवांनी त्यांना उठवले. नामदेवांनी ज्ञानदेवांच्या चरणी आपले मस्तक ठेवले. अश्रूंनी ज्ञानदेवांचे चरण धुऊन काढले. ज्ञानदेवांनी मोठ्या आदराने आणि प्रेमाने त्यांना

उठवले. दृढ आलिंगन दिले. भावभिजल्या स्वरात ते म्हणाले, ''नामदेवा, मी येतो. पण आपण मला वचन दिले आहे.'' नामदेव म्हणाले, ''माउली, आता उर्वरित जीवन आपल्या वचनाच्या पूर्तीसाठीच.'' ज्ञानदेवांनी सिद्धेश्वराचे दर्शन घेतले. आळंदीकडे मुख केले. प्रचंड जनसमुदाय. ज्ञानदेवांनी कृतज्ञ भावनेने हात जोडले. साऱ्या जनसागराच्या नेत्रांमधून अश्रूंचा पूर वाहात होता. वाहणारा प्रत्येक अश्रुबिंदू म्हणत होता, ''ज्ञाना, माउली नको जाऊ, नको जाऊ !''

टाळ मृदुंगांचा निनाद वाढला, गुलाल-बुक्क्याची उधळण सुरू झाली. 'जय जय रामकृष्ण हरी' च्या उद्घोषाने वातावरण भरून गेले. ज्ञानदेव त्यांचे सद्गुरू निवृत्तिनाथ यांच्या समवेत समाधि-स्थळी निघाले. समाधीचे स्थान स्वच्छ करून गोमयाने सारवले होते, गोमूत्राने पवित्र केले होते. त्यावर तुलसीपत्रे, बिल्वदले अंथरली होती. विविधरंगांची फुले पसरली होती. आसनासमोर 'ज्ञानेश्वरी' ठेवली होती. दोन बाजूला दोन समया तेवत होत्या. निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवांना समाधिस्थानी आसनस्थ केले. निवृत्तिनाथांनी या शिष्योत्तमाला अखेरचा नमस्कार केला. ज्ञानदेवांनी आपल्या ज्येष्ठ बंधू आणि गुरूंना अखेरचे वंदन केले. नेत्र मिटले. हृदयी विठू माउली साठवली. अंतरात तिचे नामस्मरण सुरू झाले. सारा देह त्या स्मरणाने सुगंधित झाला. बघता बघता देहभाव संपला. पूर्ण समाधी लागली. श्री ज्ञानेश्वर माउली समाधिस्थ झाली. निवृत्तिनाथ त्या समाधि-मूर्तीकडे वारंवार बघत, ती मनांतरी साठवत बाहेर आले. जड अंत:करणाने शिळा लावली आणि एकच टाहो फोडला. संतमंडळ, जनसागर यांच्या आक्रोशाने गगनहृदय फाटून गेले. आकाशवाणी झाली.

**अगा अगा रे ज्ञानेश्वरा। चंद्र तारा जंव दिनकरा**
**तंव तुझी समाधी स्थिरा। राहो रे निरंतर॥**
**जंववरी हे क्षितिमंडळ। जंववरी हे समुद्रजळ**
**मग कालक्षयी यथाकाळ। माझ्या हृदयी ठसावे॥**

ज्ञानदेव समाधी घेते झाले. देहाने उरले नाहीत. तत्त्वाने मात्र वारकऱ्यांच्या, भक्तभाविकांच्या, मराठी माणसांच्या मनामनात भरून राहिले. फक्त एकवीस वर्षांचे जीवन. समाज कसा वागला त्यांच्याशी ? 'संन्याशाची पोरे' म्हणून या भावंडांची हेटाळणी केली. ज्ञानेश्वर माउलीच्या भिक्षेच्या झोळीत दगड, विटकर, शेणकूट, कचरा अगदी विष्ठाही टाकली. पण ही माउली शांतिसागर. क्रोध नावाची वस्तूच नाही हिच्यापाशी. उलट माउली म्हणते,

**''जे खळांची व्यंकटी सांडो। तयां सत्कर्मी रति वाढो।**
**भूतां परस्परें पडो। मैत्र जीवांचे॥''**

समाजावर अणुमात्र क्रोध धरला नाही. उलटपक्षी ती विश्वात्मक देवाला म्हणते,

**''दुरितांचे तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्ये पाहो।**
**जो जे वांछिल तो ते लाहो। प्राणिजात॥''**

आमची माउली कशी होती ?

**''चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन।**
**ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु॥''**

ती प्रेमाचा, स्नेहाचा अखंड वर्षाव करणारी मेघमाला होती.

देहाने ती गेली, पण ती ज्ञानमाउली ज्ञानेश्वरीच्या रूपात, अमृतानुभवाच्या रूपात, चांगदेव पासष्टीच्या रूपात, असंख्य अभंगांच्या रूपात आपल्यामध्ये आहे. माउली आपल्याला सांगते आहे, ''जातीपातीचा भेद करू नका. मानवमात्रच काय, पशू, पक्षी, कीटक, वनस्पती सर्वांवर प्रेम करा. ईश्वराने आपल्याला हे देहमंदिर दिले आहे. त्यात मनाचा गाभारा आहे. त्या गाभाऱ्यात ईश्वराची प्रतिष्ठापना करा. त्याला साठवा, वारंवार आठवा, सतत त्याचे नामस्मरण करा. मग आपोआप आपला वर्तनव्यवहार पवित्र होईल.'' माउलीची एक तरी ओवी अनुभवावी. मग ती आपल्याशी मोठ्या स्नेहाने बोलू लागते. तिची अमृतवाणी आपल्या कानी पडली की आपल्याला वाटते,

**विश्वाचे आर्त माझ्या मनी प्रकाशले।**
**अवघेचि जाले देहब्रह्म।।**
**आवडीचे वालभ माझेनी कोंदाटले।**
**नवल देखिले नभाकार गे माये।।**
**बापरखुमादेवीवरु सहज विटु जाला।**
**हृदयी नटावला ब्रह्माकारे।।**



# १५ - ज्ञानयाची भेटी। नामयाची आस पूर्ण करी हरी। भक्तांचा कैवारी

माउलींनी संजीवन समाधी घेतली. नामदेवांची स्थिती काय वर्णावी ! अश्रूंनी किती वाहावे ? मनात माउलीची मूर्ती. मनाची दिठी

पाहे माउली गोमटी. अंत:करणातून हुंदका वर येऊ पाहे. शरीर गदगदा हलू लागे. आजूबाजूचे कोणी म्हणे, ''नामदेवा, काय झालं हो ?'' खूप बोलायचे असे, पण शब्द फुटत नसत. अधरांची नि:शब्द हालचाल, मुखावर कमालीची दु:खछाया. सारे संत एकमेकांना धरून तीर्थयात्रा करत, ईश्वरदर्शन घेत होते. जणू देवाला आपल्या मनातली व्यथा सांगत होते. पुरंदर गडाजवळचे सासवड गाव. सोपानदेवांनी देह ठेवण्याचे ठरवले. मार्गशीर्ष वद्य १३ या दिवशी त्यांनी देह ठेवला. सोपान सर्वांत लहान. निवृत्तिनाथांचे मन बधिर झाले. मुक्ता दु:खाच्याही पलीकडे गेली. तिचे मन अतिशय उदास झाले. तिनेही 'मार्ग हा मोकळा झाला आम्हा' असा विचार दृढ केला. चांगदेव उघड्या नेत्रांनी अनुभवत होते. सर्वात जुना देह आपला. ही मुक्ता सान आहे खरी, पण ज्ञानाने महान आहे. आपल्याला ही गुरुस्थानी आहे. या वयात ही निरासक्त झाली. आपण इतकी वर्षे हा देह सांभाळला. देह म्हणजे मी नाही हे जाणूनही. नामदेव चांगदेवांची ही भावावस्था निरखत होते.

**चवदाशे वर्षे शरीर केलें जतन । नाहीं अज्ञानपण गेलें माझें**
**अहंकारें माझें बुडविलें घर । झालों सेवाचोर स्वामीसंगें**
**अभिमानें आलों श्रीअलंकापुरीं । अज्ञान केलें दूरी मुक्ताईनें**
**नामा म्हणे योगदु:खाचे शरीर । काय याचा घोर करूनीयां**
**कृपावंत झाली जेव्हां मुक्ताबाई । स्वरूप दिशा दाही दाखवीलें**
**पाठीं पोटीं स्वरूप केलें सद्गुरूनें । तंव अभिमान गेला माझा**

**ज्यांच्या उपकाराची काय वर्णू थोरी । त्यांच्या संगे हरी जोडीयेला**
**नामा म्हणे देवा उठा संतजन । करूं आतां स्नान गौतमीसीं**

(५३५-३८ - संत नामदेवांची अभंगगाथा)

गोदातीरावरील पुणतांबे क्षेत्र. माघ वद्य एकादशीला या क्षेत्रात संतमंडळींनी हरिजागर केला. द्वादशीला कीर्तन सोहळा संपन्न झाला. त्रयोदशीला चांगदेवांनी समाधी घेतली. त्यांच्या समाधीला प्रणिपात करून संतमंडळी म्हाळसापुरी म्हणजेच नेवासे या क्षेत्री आले. या ठिकाणीच मायबोलीने समृद्धरूप धारण केले होते. ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी अवतीर्ण झाली होती. प्रवरा नदीतीरावरील शिवमंदिर. नामदेवांनी ज्ञानदेवांच्या स्मरणात मंदिराच्या पायरीवर मस्तक ठेवले. प्रेमाश्रूंनी पायरी भिजवून टाकली. संतमंडळीच्या नेत्री पाणी उभे राहिले. निवृत्तिनाथ शिवदर्शन घेऊन शांतपणे एका दगडी खांबाला डोळे मिटून बसले. मुक्ता धावली. जिथून ज्ञानादादानं ज्ञानेश्वरी कथन केली तिथं गेली. हस्तस्पर्श करून ज्ञानादादाला भेटली. झंपराच्या बाहीने डोळे पुसत त्याचे रुपडे आठवू लागली. बरोबरची संतमंडळीही गहिवरून गेली. नामदेव निवृत्तिनाथांना म्हणाले, ''नाथ, आपण तुमच्या मूलस्थळी आपेगावी जाऊ. तिथं तुमच्या पणजोबांची, त्र्यंबकपंतांची समाधी आहे. तिथं दर्शन घेऊ.'' नाथांनी होकार दिला. मंडळी आपेगावी आली.

**निवृत्ति मुक्ताईनें पाहुनि स्थळ डोळां । आलासे उमाळा ओसंडोनी**
**तात आणि माता गेलीसे येथून । तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा**
**निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न । सांभाळी सोपान मजलागी**

**तुझ्या योगें हरि क्रमियेलें काळा । फुटलासे मेळा तापसांचा**
**नामा म्हणे यांचे कळवळिलें मन । करी समाधान पांडुरंग**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ५५८)

आपेगाव सोडून हा संतमेळा वेरूळाला गेला. घृष्णेश्वराचे दर्शन घेतले. मुक्ताई अबोल झाली. निवृत्तीने तिच्या मस्तकावर हात ठेवून विचारले. ''मुक्ता, निजधामी जाण्याचा दिवस निर्धारित केलास ?'' मुक्ता म्हणाली, ''दादा, मी सांगावं असं नाही. ज्ञानादादा, सोपानदादा यांच्याच मार्गावरून जाणारी मी. येणंजाणंच म्हणशील तर या नश्वर देहाचं. दादा, आता या देहाचं कवतिक करूच नये असं वाटतं.'' निवृत्ती काही बोलू शकले नाहीत. वैशाखवणव्यात संतमेळा तापीतीरी आला. सोमेश्वराचे दर्शन घेतले. त्या तापलेल्या उन्हातून संतमेळा चालू लागला. एवढ्यात गगनांतरी कृष्णमेघांची दाटी झाली. सोसाट्याचा वारा सुटला. झाडे, वेली हालू लागल्या. धुळीचे, पालापाचोळ्याचे लोट वारा उडवू लागला. विजा चमकू लागल्या. वारंवार कडकडाट करून कर्ण बधिर करू लागल्या. आजूबाजूला विजा कोसळू लागल्या. संतमेळा निसर्गाच्या या रूपातही 'रामकृष्ण हरी' चा उद्घोष करत होता. एवढ्यात एक प्रचंड विजेचा तेजस्वी प्रकाश प्रकटला. कानठळ्या बसवणारा ध्वनी झाला. सौदामिनीने आपल्या तेजःपुंज करद्वयांत तेजोमय मुक्ताईला घेतले. बघता बघता मुक्ता त्या गगनाकारात तदाकार झाली.

**गर्जतां गगन कडाडली वीज । स्वरूपीं सहज मिळियेली**
**मावळला दीप ज्योत कोठे होती । सहज सामावती निरंजनी**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ५६६)

"मुक्ता, मुक्ता..." निवृत्तिनाथ जोरजोरात हाका मारू लागले. आकाशातून जोराचा पाऊस पडू लागला. विजांचे कडकडाट सुरूच होते.

**जेष्ठाच्याही आधीं कनिष्ठाचें जाणें । केलें नारायणें उफराटें**
**उफराटें फार कळलें माझे मनीं । वळचणीचें पाणी आढ्या आलें**

विरक्त निवृत्ती पूर्ण निवृत्त झाले. चार भावंडे, त्यातली धाकटी तीन गेली. आपल्या डोळ्यांदेखत गेली. आपणच या नरदेहाला चिकटून का आहोत ? संतमेळासुद्धा उदासवाणा झाला. किती लहान मुलं, पण किती विचारी, ज्ञानी आणि विरक्त. नामदेव यांचा नामादादा होता. आपली भावंडं जावीत, आपला भक्ती आणि भावपूर्ण गणगोत असा लहान व्हावा. त्यांचे मन सैरभैर झाले. संतमेळ्यातल्या प्रत्येक संताची मानसिक अवस्था तशीच होती. साऱ्यांनी सप्तश्रृंगीच्या डोंगराला प्रदक्षिणा घातली. देवाचे दर्शन घेतले. पुढे ते त्र्यंबकेश्वरी आले. निवृत्तिनाथ म्हणाले, "आता आम्हांला निरोप द्या. आम्ही निजधामी निघालो." नाथांनी समाधी घेतली. ज्येष्ठ वद्य द्वादशी.

**लोपलासे भानु पडला अंधार । गेला योगेश्वर निवृत्तिराज**
**गेल्या त्या विभूती अनादि अवतार । आतां देवा ! फार आठवतें**
**नामा म्हणे हरी धरवेना धीर । येतो गहिंवर वोसंडोनी**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ५९३)

शके १२१८ ते शके १२१९. वर्षामध्ये चांगदेव आणि ही चार भावंडे दृष्ट लागावी तशी गेली. आयुष्याचा कालखंड किती कमी

आणि काय ? युगानुयुगे लोकांच्या स्मरणगृहात जतन व्हावे असे अतिशय पवित्र कार्य. मार्गशीर्षात सोपानदेव, माघात चांगदेव, वैशाखात मुक्ताई, ज्येष्ठात निवृत्तिनाथ. ज्ञानेश्वर माउलीपाठोपाठ सारे गेले. नामदेव विचार करता करता पार कोसळले. ''मी तरी का जगावं ? या प्रपंचासाठी ? मी...मी कधी प्रपंच केला होता ? या प्रपंचाची आस तर मला कधीच नव्हती. मला तरी का ठेवलंस विठ्ठला ?'' स्मितहास्य करत विठ्ठल प्रकट झाला, ''नामदेवा, तू माझा सखा, मित्र ना ? इतक्या लवकर निराश झालास ? ज्ञानदेवांना माउली म्हणतोस ना ? माउलीला काय वचन दिलं आहेस तू ? आठवतंय ? वचनपूर्ती झाल्याशिवाय मलासुद्धा तुला बोलावून घेता येणार नाही.'' नामदेव भावावस्थेतून जागे झाले. संतांनी एकमेकांचा निरोप घेतला. नामदेव आपल्या मुलाबाळांसह पंढरपुरी परतले.

आल्याआल्या नामदेव विठ्ठलमंदिरात गेले. फार दिवसांनी त्या पांडुरंगाचे सगुण साकाररूपात दर्शन होत होते. नामदेवांच्या नेत्रांमधून आनंदाश्रू ओघळू लागले. ते विठुरायाला म्हणाले, ''तू सगळ्यांना आपल्याजवळ बोलावून घेतलंस, आणि आम्हांला मात्र अतृप्त ठेवलंस. त्या ज्ञानराजाचं दर्शन घ्यावं, असं मला वाटतंय. एकदा, एकदा मला माउलीचं दर्शन घडव.'' विठुचरणावर ते कोसळले.

**ज्ञानदेव माझें सौख्य सरोवर । त्यांत जलचर स्वस्थ होतों**
**दुर्दैव तापाने आटलें तें नीर । वर्षी रघुवीर कृपामेघ**
**ज्ञानदेवावीण व्याकुळ हे प्राण । तूं जगज्जीवन देवा होसी**
**विठाबाई तूं गे जाणसी ना जाण । रक्षी मज कोण दुजें येथें**

**नामा हें वदतां डोळ्यां आलें पाणी । पडिला धरणी देवापुढें**
**नामदेव स्थिति पाहून श्रीपति । विस्मित ते चित्तीं स्तब्ध झाले**
**कैशा रीतीं नाम्या संबोखूं मी आतां । कठिण अवस्था देव म्हणे**
**प्रेम उचंबळे ऐकतां ही आळ । बुझावी गोपाळ नामयालागीं**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ४७२, ४७३)

पांडुरंग म्हणाला, ''नामदेवा, अरे तू अजून देहावर, सगुण-साकारावर प्रेम करतोस ? तू तर उच्च साधक आहेस. तुझ्या निर्मळ भक्तीनं मीही तुझा झालो. मी आणि तू यात जर आत्मतत्त्व म्हणून फरक नाही तर मी आणि ज्ञानदेव यांतही द्वैत नाही. तू जाणतोस खरं तर ! त्यानं गीता, अमृतानुभव अभंगवाणी सारं ब्रह्मज्ञान मायबोलीत मोकळं केलं. तूही कीर्तनात काही कमी ब्रह्म सांगत नाहीस ! तुझ्यात आणि ज्ञानेश्वर माउलीत काय फरक आहे, कोणतं अंतर आहे, सांगशील ?'' नामदेव गहिवरून म्हणाले, ''विठूराया, आत्मा, एकतत्त्व, अद्वैत, ब्रह्मज्ञान सारं सारं आपल्या जागी ठीक आहे. पण आम्ही देही आहोत. या सगळ्यांसमवेत या मृत्युलोकात आम्हांला मायासुद्धा चिकटली आहे. त्या ज्ञानयोग्याचं दर्शन घेण्याची आस त्यामुळंच आहे असं समज. विठ्ठला, ती माउली ज्ञानमाउली म्हणून अनंत, पण माझ्याहून वयानं लहान ना रे ? संतांना भेटावं, सत्संग करावा ही तुझीच शिकवण आहे. देवा, माझा हा लडिवाळ हट्ट पुरवा, माझी शपथ आहे तुम्हांला.'' विठ्ठलाला नामाचे मोठे कौतुक वाटले. विठ्ठल या दोन संतांच्या परस्परांवरच्या प्रेमाने गहिवरून गेला. त्याने नामदेवांपुढे साक्षात ज्ञानदेवांना प्रकट केले. नामदेव माउलीच्या चरणांवर कोसळले.

**ज्ञानदेव पाहतां डोळां । नामदेवा हर्ष झाला**
**घट्ट धरियेले पाय । तूं तो झाला सद्गुरुराय**
**नको करूं रे अव्हेर । मज नको धरूं दूर**
**नाथा नको रे अंतरुं । तुझ्या कांसेचे वासरूं**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ४८५)

ज्ञानदेवांनी नामदेवांना उठवले. घट्ट आलिंगन दिले. ''नामदेवा, किती हा वेडेपणा ! अहो, माझ्याहून ज्ञानानं, वयानं मोठे तुम्ही ! किती वेडा हट्ट हा ? आणि ही विठुमाउली वात्सल्यानं भरलेली, तुमची ही आर्त तिनं पुरवली. मीही तुमच्या प्रेमानं भरून पावलो. तुमच्या प्रेमभक्तीच्या कृपेनं धन्य झालो.'' बोलता बोलता ज्ञानदेव अंतर्धान पावले.

**हरिचिया दासा नामया उदासा। तुझी हृषीकेशा प्रीति बहू**
**हरिदासांमाजी होसी तू आगळा। प्रेमाचा पुतळा नामदेवा**
**ज्ञानदेवा म्हणे तूं विठोचा लडिवाळ। नामया तूं कृपाळ आम्हांवरी**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ४८७)

या दोन संतांचे प्रेम पाहून विठ्ठलही धन्य झाला.



## १६ - नामयामुखी सावता माळी

संत नामदेवांना विठ्ठलकृपेने ज्ञानेश्वरमाउलींचे दर्शन झाले. ते त्यांनी मनी-हृदयी साठवले. साठवलेले, आठवावे पुन्हा आठवावे असा तृप्ती अतृप्तीचा खेळ. नामदेव आपल्या कीर्तनात त्यांच्या

समाधी सोहळ्याचे भावपूर्ण वर्णन करत. श्रोत्यांच्या समोर प्रसंग जिवंत करत. वर्णन करताना त्यांना भावनावेग आवरत नसे. श्रोत्यांच्या डोळ्यांमधूनही अश्रुधारा वाहू लागत. आज त्यांनी त्या समाधी सोहळ्याचेच वर्णन करावे अशी श्रोत्यांची इच्छा होती. परंतु नुकतीच अरणभेंडीहून अतिशय दु:खद वार्ता आली. पांडुरंगाचे परमभक्त सावतामाळी गेले, विठ्ठलरूप झाले. डोळ्यांत अश्रू घेऊनच नामदेव कीर्तनाला उभे राहिले. निरूपणाचा विषय होता 'सावता माळी.'

**समयासी सादर व्हावें । देव ठेविल तैसें रहावें**
**कोणे दिवशीं बसून हत्तीवर । कोणे दिवशी पालखी सुभेदार**
**कोणे दिवशीं पायाचा चाकर । चालून जावें**
**कोणे दिवशीं बसून याची मन । कोणे दिवशीं घरांत नाहीं धान्य**
**कोणे दिवशीं द्रव्याचें सांठवण । कोठें साठवावें**
**कोणे दिवशीं यम येती चालून । कोणे दिवशीं प्राण जाती घेऊन**
**कोणे दिवशीं स्मशानीं जाऊन । एकटें रहावें**
**कोणे दिवशीं होईल सद्‌गुरूची कृपा । कोणे दिवशीं चुकती जन्माच्या खेपा**
**कोणे दिवशीं सावत्याच्या बापा । दर्शन द्यावें**

बंधुभगिनींनो, सावता माळी महान संत होते. त्यांचे वडील परसू, आई नंगिता दोघंही पांडुरंगाचे परमभक्त. सावतावर त्यांनी संस्कार केले श्रमाचे, प्रामाणिकपणाचे आणि भक्तिभावाचे. सावतांचं जीवन पाहिलं की आपण धन्य होतो. त्यांच्यामुळे अरणभेंडी पुण्यक्षेत्र झालं.

**धन्य ते अरण, रत्नांचीच खाण । जन्मला निधान सावता तो**
**सावता सागर, प्रेमाचा आगर । घेतला अवतार माळ्या घरी**

भानवसे पाटलांची कन्या जनाबाई त्यांची पत्नी. तिनं आपल्या पतीला कष्टात आणि भक्तीत दोन्हीत साथ दिली. एक दिवस हे सावता मळ्यात काम करत होते. नांगरताना एक गोलाकार असा मोठा दगड लागला. तो दगड शेंदूर फासलेला होता. सावतांनी तो दगड ढकलत ढकलत बांधाकडं आणला. बांधावरच्या एका झाडाला टेकवून ठेवला. ही गोष्ट जाणाऱ्या-येणाऱ्या लोकांनी बघितली. मंडळी, मळा सावतांचा. ते कष्ट करत असताना मिळालेला दगड त्यांनी बांधाकडेच्या झाडाला टेकवला. यात अन्य कोणी लक्ष का घालावं ? पण नको तिथं लक्ष घालण्यातच लोक आपला वेळ वृथा घालवतात आणि ज्ञानदेवांना.... बरं का मंडळी, त्या माउलीचाही काही लोकांनी द्वेष केला. सावता त्याला अपवाद कसे असतील. कामाजी माळी, ओंकार स्वामी, महादेवशास्त्री असे सावताचे शत्रू होते. सावता संतवृत्तीचे. त्यांना शत्रू नव्हते पण त्यांचे शत्रू होते. त्यांनी सावतांना येऊन सांगितलं की, 'तो दगड म्हसोबाचा आहे. तो होता तिथंच नेऊन ठेव. त्याची पूजा आपण करू. म्हसोबाला बळी द्यावा लागतो. दगड तू हलवलास. या पापाचं पुरश्चरण तूच करायला हवंस. त्याला बळी द्यायला तुझ्या दोन बकऱ्या दे.' सावतांनी साफ नकार दिला. देवानं निसर्ग निर्माण केला. जीवसृष्टी निर्माण केली. ईश्वर करुणेनं परिपूर्ण भरलेला. तो बळी कसा मागेल. सावतांना निसर्गाचं ज्ञान होतं. केवळ फळं, भाजीच नव्हे तर वेली, वनस्पती, मुळ्यांची औषधी उपयुक्तताही त्यांना ठाऊक होती. बऱ्याच वेळा ते रुग्णांवर उपचार करत. कोणी मोबदला देऊ केला तर म्हणत, 'ईश्वराची देणगी मी वाटली. मला काही नको. त्या पांडुरंगाच्या पायी

डोई ठेवा, स्वत:ची, अवती भवतीची स्वच्छता राखा, यातच मला सर्व पावलं.'

काही दिवसांनी गावात पटकीची साथ आली. अर्थात याचं खापर सावता माळी आणि म्हसोबावर फोडलं गेलं. त्यांच्या फुलाफळांनी आणि भाज्यांनी डवरलेल्या मळ्यात गुरं घुसवली. गुरांनी मनसोक्त खाल्लं. मळ्याची नासधूस झाली. सावता मळ्याकडं धावले. लोकांनी त्यांनाच मारझोड केली. ते जखमी होऊन धरणीवर कोसळले. सावताची पत्नी जनाबाईंनी त्यांची सेवा केली. आपल्या पतीला काही कारण नसताना, कोणताही अपराध नसताना मारलं. आपल्या मळ्याचंही न भरून येणारं नुकसान केलं. तिला खूप दु:ख झालं आणि रागही आला. सावतांनी त्याही अवस्थेत तिचं सांत्वन केलं, तिला शांत केलं. सावता बरे झाले. त्यांनी पुन्हा मळा लावला. घामाची शिंपण करून परत मळा फुलवला. त्याचवेळी सावतांना कन्या झाली. सावता आणि जना दोघांना परमानंद झाला. तिचं नाव त्यांनी नागू ठेवलं.

मंडळी, प्रत्येक माणसाच्या जीवनात संकटं येतात. आपण संकट आल्यावर घाबरून जातो. पण संत-सज्जन संकटांना धीरानं सामोरे जातात. सावता त्याच प्रभावळीतले बरं ! आणि दुसरी त्यांची फार मोठी प्रवृत्ती म्हणजे, त्यांनी कधी कोणाबरोबर वैर धरलं नाही. पुढं या महादेवशास्त्र्यांचा मुलगा आजारी पडला. ताप उतरेना. वैद्य झाले, हकीम झाले, दैवी उपायही झाले. कशाचा उपयोगच होईना. कोणी म्हटलं, 'अहो, सावता माळी झाडपाल्याचं नाहीतर मुळ्यांचं औषध देतात. उतार पडतो म्हणे त्यानं.' महादेवशास्त्री, ज्यांनी

सावतांना आजवर खूप त्रास दिला होता, यातना दिल्या होत्या, पण मुलाचा जीव महत्त्वाचा होता. नाइलाजानं ते सावतांच्या घरी गेले. हात जोडून त्यांना विनंती केली. सावतांचं मन गगनासारखं विशाल. अहो, त्यांच्या मनी तर राग नव्हताच. ते महादेवशास्त्र्यांच्या घरी गेले. मुलावर उपचार केले. मूल बरं झालं. शास्त्रीबुवांनी सावतांचे पाय धरले. इकडं कामाजी माळी आणि ओंकारस्वामी, दोघांनाही पोटदुखीचा त्रास सुरू झाला. आधी सावतांची भक्ती, त्याचा फुललेला मळा बघून दोघांना पोटदुखी होती. आता खरी शारीरिक पोटदुखी सुरू झाली. धरणीवर वेदनेनं ते गडाबडा लोळू लागले. सावतांनी त्या दोघांनाही औषध दिलं. दोघंही व्याधिमुक्त झाले. त्यांनी सावतांचे चरण धरले. 'आमचं चुकलं, क्षमा करा. आज आपण नसतात तर आमचे प्राणच गेले असते.' त्यांना उठवून सावता म्हणाले, 'ही सारी भक्तवत्सल विठ्ठलाची कृपा.'

भक्तजन हो, या सावता माळ्यांच्या भक्तीबद्दल काय बोलावं, किती सांगावं ! आपला मळा ते आपला मानत नसत. मळा विठ्ठलाचाच आहे. असं ते म्हणत असत आणि मनापासूनच तीच त्यांची धारणा होती. त्यांची कन्या नागू, तीही विठ्ठलभक्त. ती सुद्धा तसंच मानत होती. ती सावतांना विचारत असे, 'बाबा, आपल्या मळ्याचा स्वामी तो विठुराया. तो आपल्या मळ्याकडं का येत नाही ?' सावतांना आपल्या कन्येचं मोठं कौतुक वाटलं. त्यांनी तिला प्रेमानं जवळ घेतलं आणि म्हणाले, 'अगं पोरी तो सगळ्या जगाचा पालनकर्ता. त्याला किती कामं असतील ! तरीपण त्याला सवड झाली की तो नक्की आपल्या मळ्यात येईल.' एक दिवस काही

वारकरी मंडळी पंढरपूरला निघाली होती. नागूनं एका टोपलीत ताजी भाजी, फळं घातली. ती त्या वारकऱ्यांना म्हणाली, 'दादा, हा नैवेद्य माझ्या विठुरायाला नेऊन द्याल का ? त्याला सांगा, तुझ्याच मळ्यातली ही भाजी आणि फळं आहेत.' काही वारकऱ्यांनी या चिमुरड्या पोरीची थट्टा केली. पण एका वारकऱ्यानं नागूच्या मनातला भक्तिभाव जाणला. त्यानं ती टोपली हातात घेतली आणि नागूला प्रेमानं म्हणाला, 'मी देईन हो सारी भाजी त्या विठुमाउलीला.' नागूला आनंद झाला. ती म्हणाली, 'दादा, त्या विठुरायाला सांगा, मळा तुमचाच आहे. माझे आईबाबा सारखं तुझं नाव घेतात. आणि बरं का, मी सुद्धा तुझंच नाव घेते. त्याला सांगा की, नागू तुमची वाट बघतेय. तुम्ही निरोप मिळाल्यावर लगेच या. द्याल ना निरोप माझा ?' त्या वारकऱ्याचा ऊर भरून आला. निष्पाप, निर्व्याज, निखळ आणि अपार प्रेम. या पोरीच्या निमंत्रणानं तो नक्की येणार. वारकऱ्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. तो प्रेमानं म्हणाला, 'बाळ, मी तुझा निरोप विठ्ठलाला नक्की सांगेन. आणि तो सुद्धा येईल. त्याचं आपल्या भक्तांवर खूप प्रेम आहे.' अरणभेंडी ते पंढरपूर १८ मैलांचं अंतर. वारकऱ्यानं नागूनं दिलेली टोपली विठ्ठलासमोर ठेवली. हात जोडून त्यानं तिचा निरोप जसाच्या तसा सांगितला.

त्या दिवशी संध्याकाळी मळ्यातली कामं उरकल्यावर सावता नागूला म्हणाले. 'चल बाळ, घरी जाऊ. आई वाट बघत असेल.' नागू म्हणाली, 'बाबा, आज तो पांडुरंग येणार आहे. मी वारकरीदादांबरोबर भाजी, फळं नैवेद्य म्हणून पाठवली आहेत. लगेच या, असा निरोपही दिला आहे. विठोबा येईल, मला थांबायला हवं.

मी इथंच थांबणार.' पोरीचं हे भगवत्प्रेम पाहून सावता धन्य झाले. त्यांनी तिला जवळ घेतलं. ते म्हणाले, 'मीही थांबतो इथं. तुझ्या निमंत्रणानं तो नक्की येईल.' सावता विठुरायाचा धावा करू लागले. पती आणि कन्या दोघंही घरी आले नाहीत. वाट बघून जनाबाई आल्या. पोरीच्या कौतुकानं त्यांच्या शब्दांनी अश्रूंचं रूप धारण केलं. तिघंही त्या भक्तवत्सल पांडुरंगाचा धावा करत मळ्याच्या बांधावर बसले. रात्र सरली. भास्कर आपल्या कोवळ्या किरण पावलांनी आला. पक्षी आनंदानं किलबिलाट करू लागले. मळ्याचा परिसर एकदम तेजानं झळाळून गेला. साक्षात विठ्ठल समोर उभा. सावता, जना आणि नागू तिघांचाही आनंद काय वर्णावा ! त्यांनी त्या जगत्पालकाच्या चरणी डोई ठेवली. या भगवंताला कुठं ठेवू आणि काय करू असं त्यांना झालं. पांडुरंग म्हणाला, 'तुझ्या नागूनं मला बोलावलं खरं, पण माझ्या मागं लोक लागले आहेत. मला लपव.' पांडुरंगानं अतिलघुरूप धारण केलं. तो सावतांच्या हृदयांतरी जाऊन बसला.

मंडळी, माझा हा अनुभव आहे. सावता माळ्यांची योग्यता काय आहे, याची इतर संतांबरोबर मी अनुभूती घेतली आहे. निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपान, मुक्ता त्या दिवशी विठुरायाच्या दर्शनासाठी पंढरपुरात. राउळात विठ्ठल नाही. भगवंताला शोधायचं कसं ? ज्ञानदेव म्हणाले, ' भगवंतांच्या कंठात तुळसीहार. तुळसीच्या गंधानुरोधानं जाऊ.' सावता माळ्यांची सारी तनू तुलसी-गंधानं व्यापलेली. विठुमाउली सावतांच्या हृदयात. निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपान, मुक्ता आणि मी सावतांच्या चरणी डोई ठेवली. पांडुरंग

प्रकट झाला. सावतानं फुलवलेला मळा बघून संतुष्ट झाला. नागूला त्यानं प्रेमानं कुरवाळलं. सावता-जनाला आशीर्वाद दिले. आम्हा मंडळींना दर्शन दिलं आणि अंतर्धान पावला.''

वर्णन करता करता नामदेवांना हुंदका फुटला. ''सावता, सावता... प्रामाणिक होते. श्रद्धाळू... कष्टाळू होते. शांतीचा, क्षमेचा पुतळा होता तो. त्यांनी देह ठेवला. खरं आहे, देह हे वस्त्र आहे. आत्मा अमर आहे. पण मनासमोरून ती मूर्ती हलत नाही ना ! सावता देहानं गेले पण तत्त्वानं उरले. जाताना ते आपल्या पत्नीला म्हणाले, खरं तर आपल्याला सर्वांनाच ते लागू आहे.

**प्रपंच असोनी । परमार्थ साधावा**
**वाचे आठवावा । पांडुरंग**
**उंच-नीच काही । न पाहे सर्वदा**
**पुराणीच्या कथा । पुराणीच**
**घटका आणि पळ । साधी उतावीळ**
**वाऊगा तो काळ । जाऊ नेदी**
**सावता म्हणे कांते । जपे नामावली**
**हृदय कमळीं । पांडुरंगा**



# १७ - भक्तिप्रताप नामयाचा !

नामदेव राजाईला म्हणाले, ''ऐकलं का, मी माउलींना वचन दिलंय. माउलींनी माझ्यावर इतका विश्वास ठेवला. माझं भाग्य

मोठंच ! त्यांच्याबरोबर तीर्थयात्रा ही माझ्या जीवनातली विलक्षण अनुभूती. त्यांचं बोलणं म्हणजे अमृतवर्षाव. बोलताबोलता मुखातून अभंग अवतीर्ण व्हावेत. काय त्या उपमा, किती दृष्टांत. विषय सोपा करून सांगणं. भरभरून देत होते. किती घ्यावं असं माझं झालं होतं. केवळ परमानंद होता तो. त्यांनीच या वारकरी संप्रदायाची धुरा माझ्या खांद्यावर सोपवली आहे. निव्वळ महाराष्ट्रच नाही, तर सारा भारतवर्ष या एकतेच्या ध्वजाखाली यावा. इतकंच नाही तर पुढं येणाऱ्या काळात विश्वामधल्या सर्व प्राणिमात्रात अभेद निर्माण करायचा आहे. भेदभावमुक्त विश्वाची मागणी माउलींनी विश्वात्मक देवाजवळ पसायदानात केली आहे. मला महाराष्ट्र आणि आपला देश इथपर्यंत तरी हा वारकरी संप्रदाय पोचवायचा आहे, रुजवायचा आहे.''

राजाई म्हणाली, ''माउलींनी तुमच्यावर इतक्या विश्वासानं जबाबदारी सोपवली आहे. आपली श्रेष्ठ अशी योग्यता आता मला कळायला लागली आहे. खरं सांगू, आधी मला वाटायचं कसल्या घरात मी येऊन पडले ! संकट यायचं, पण त्याचा त्रास वाटायचा. आपल्या वागण्याचा अर्थच समजत नव्हता. कधी कधी तरी, हे जीवनच संपवून टाकावं असं वाटायचं. पोरं समोर दिसायची. मग वाटायचं या पोरांसकट... पण त्यातूनही निभावून जायचं. असंख्य प्रश्न, अनेक शंका मनात निर्माण व्हायच्या. सासुबाई होत्या, तोपर्यंत त्यांच्या कुशीत शिरायचे. सासूबाईंची आठवण झाली तरी...'' राजाईला हुंदका फुटला. ''त्या सासूबाई नव्हत्याच मुळी. आईच माझी ! कधी कधी सासूबाईसुद्धा माझ्यासारख्याच गोंधळून जायच्या.

तुमच्यावर त्यांचं खूप खूप प्रेम होतं. म्हणूनच तुमची त्यांना फार-फार काळजी वाटत असे. या सगळ्या प्रसंगी आम्हा दोघींना धीर द्यायच्या जनाबाई. या जनाबाईंचं किती कौतुक करावं तितकं थोडं आहे ! अपार कष्ट, आजही करतात. किती समजुतदार आहेत ! जिव्हाळ्यानं, वात्सल्यानं त्या सांगतात ना, तेव्हा वाटतं ईशमाताच त्यांच्या मुखातून बोलतेय. सासूबाई गेल्या, मामंजीही पाठोपाठ गेले. पायाखालची जमीनच दुभंगली, असं झालं. जनाबाईंच्या कुशीत शिरले. त्यांची सारी काया थरारत होती. त्याही खूप रडल्या. पण नंतर मला इतका आधार दिला, काय सांगू ! तुमच्या प्रत्येक कृतीचा खरा अर्थ त्यांच्यामुळंच उमगला. आज वाटतं, ज्यांनी देवाला घास भरवला, ज्यांच्याबरोबर देव बोलतो, देव ज्यांचा सखा आहे, ज्यांच्या कीर्तनात पांडुरंग नाचतो असे माझे पती आहेत ! काय बोलू मी. आता मी आपल्याला अडवणार नाही.'' कार्तिकवारी झाली. नामदेव निघाले. एरवी विरोध करणारी आपली पत्नी आज आनंदाने तयार होते आहे. जनाबाईंचे केवढे ऋण आहे आपल्यावर ! राजाईने नामदेवांच्या हातावर दही घातले. डोळ्यांत अश्रू आणि ओठी हसू अशी स्थिती होती. ''लवकर या, आम्ही वाट बघतो आहोत.'' मुखातून अस्फुट उद्‌गार प्रकटले.

काही वारकरी सोबत आले. पायीच बहुतांशी प्रवास. क्वचित प्रसंगी बैलगाडीची सोय होत असे. जातीजातीतला भेद. जातीत परत पोटजाती. देव मानण्यावरूनही भेदभाव. हरिभक्त हरभक्तांना मानत नसत, तर हरभक्त हरिभक्तांना मानत नसत. एकमेकांचा पराकोटीचा द्वेष करत असत. प्रभू रामचंद्र शंकरभक्त तर शंकर रामभक्त !

समजून द्यायला हवे. सर्व प्रकारचे भेदभाव संपून समाज एकसंध व्हायला हवा.

आंध्र प्रदेशातल्या श्रीशैल्यम्चे दर्शन त्यांनी घेतले. श्रीरंगपट्टणचा श्रीरंगनाथ, मदुरेची मीनाक्षी देवी, शिवकांची, विष्णुकांची करत करत ते रामेश्वरला आले. तिथे आद्य शंकराचार्यांनी अर्पण केलेले सुंदर आणि पवित्र स्फटिकलिंग. नामदेव आणि सर्व वारकऱ्यांच्या नेत्रांमध्ये आनंदाश्रू उभे राहिले. या दर्शनाने ते धन्य झाले. हा नुसता प्रवास किंवा देवदर्शन नव्हते. होता एकतत्त्वाचा, अद्वैतवादाचा प्रसार. दया, क्षमा, शांती या त्रिसूत्रीची पेरणी. सद्वर्तन, परोपकार आणि एक ईश मानून श्रद्धायुक्त भक्तीचा संस्कार. नामदेव आपल्या प्रवासात जागोजागी कीर्तन, प्रवचने करत असत. हा प्रवास सुमारे सहा वर्षे चालला.

सहा वर्षे झाली. नामदेवांना पांडुरंगाचा आठव झाला. आता भगवंताचे दर्शन घ्यायलाच हवे. नामदेव साऱ्यांसह पंढरपुरी परतले. आधी राउळात जाऊन त्या जगत्पालकाचे दर्शन घेतले. पांडुरंगाच्या नेत्री आनंदाश्रू आले. राजाई, नारा, विठा, महादा, गोविंदा, लिंबाई, आउताई साऱ्यांना अत्यानंद झाला. जनाबाईंनी नामदेवांच्या चरणी डोई ठेवली. नामदेवांनीही जनाबाईंच्या चरणी आपले मस्तक ठेवले. दोघे बहीणभाऊ अश्रुपूर्ण नेत्रांनी एकमेकांकडे बघत होते. मूकपणे संवाद साधत होते. 'आपण धन्य आहात. माउलीला दिलेल्या वचनाची पूर्ती करत आहात.' 'जनाबाई, हे सारं तुमच्या जिवावर. माझ्या पत्नीला आणि मुलाबाळांना तुमचा केवढा आधार आहे !' जनाबाई प्रकटपणे म्हणाल्या, ''लिंबाईचं वय लग्नायोग्य झालंय.

परवाच वरपक्षाची मंडळी येऊन गेली. आपल्या येण्याचीच वाट बघत होतो आम्ही.'' खरे तर लिंबाईचे लग्न लांबले होते. तेही संपन्न झाले. लिंबाई सासरी गेली.

नामदेवांची दिनचर्या सुरू झाली. आता उत्तरेकडे जाण्याचा विचार मनात घोळत होता. भारतभ्रमण करायचे आहे. वारकरी संप्रदायाचा तत्त्वसिद्धांत जनामनात रुजवायचा आहे. मनात असा बेत सुरू असतानाच बीदरचा राहणारा एक गृहस्थ येऊन नामदेवांना भेटला. ''महाराज, मी पांडुरंगाला नवस बोलल्रो होतो. त्या भक्तवत्सलानं माझ्या सर्व इच्छा पूर्ण केल्या. आपलं कीर्तन मी माझ्या घरी ठेवीन असं त्या भगवंताला वचन दिलं होतं. मी जाणतो, आपल्या कीर्तनानं भगवंताला खूप आनंद होतो. आपण नाही म्हणू नका. आपली सगळी व्यवस्था मी ठेवेन,'' त्या गृहस्थाने नामदेवांच्या चरणांवर डोके ठेवले. चरण घट्ट पकडले. नामदेवांनी त्या गृहस्थाला उठवले. ते म्हणाले, ''कीर्तनसेवा करण्यासाठी बोलवता आहात. त्या निमित्तानं सेवा घडेल. आपण विठ्ठलभक्त आहात. नकाराचा प्रश्नच उद्‌भवत नाही.''

यावेळी थोरला नारा, धाकटा महादा सोबत आले. काही वारकरीसुद्धा बरोबर आले. टाळ, मृदंग, भगव्या पताका घेऊन 'रामकृष्ण हरी' चा गजर करत निघाले. या दिंडीला जाताना गावागावातले आणखी वारकरी येऊन मिळाले. बीदरची वेस ओलांडली आणि एक संकट उभे राहिले. भगवे ध्वज, भगव्या पताका बघून कोणी सुलतानाला जाऊन सांगितले की, आपल्यावर हल्ला करायला काही लोक चाल करून येताहेत. सुलतानाने आपल्या प्रधानाला सैन्य घेऊन पाठवले. पण यांच्याजवळ तर शस्त्रे नव्हतीच. होते ते

फक्त टाळ, मृदंग. खांद्यावर भगवी पताका आणि मुखात हरिनाम. साऱ्यांना पकडून सुलतानासमोर हजर करण्यात आले. सुलतानाने त्यांना विचारले, "आपण कोण ? इतक्या संख्येनं आपण आमच्या राज्यात का आला आहात ?" नामदेवांनी हात जोडून सांगितले, "आम्ही वारकरी आहोत. विठ्ठलभक्त आहोत. कीर्तनासाठी इथवर आलो आहोत." बीदरच्या गृहस्थानेही हात जोडून सांगितले, "महाराज, माझा नवस फेडण्यासाठीच मी यांना बोलावलं आहे. कीर्तन करून हे परतणार आहेत. हे नामदेव फार मोठे संत आहेत." सुलतान म्हणाला, "अच्छा, तर हे संत आहेत ! हमने तो सुना है, संत चमत्कार करते हैं। ते कोण संत, त्यांनी तर जनावरला वेद बोलायला लावले." नामदेवांनी हात जोडले. "ज्ञानेश्वरमाउली, महाराज, चमत्कार कोणी मुद्दाम करत नाही. चमत्कार कोणी स्वार्थ साधण्यासाठी करत नाही. संत तर तसा चमत्कार करतच नाहीत. संत ईश्वरी कार्य करतात. त्या कार्यात कोणी अडथळा आणला तर निरुपायानं चमत्कार घडतो. ते त्या महान विभूतीच्या परमभक्तीचं सामर्थ्य असतं."

"बहोत खूब ! आम्हांलाही तुमच्या भक्तीचं सामर्थ्य अजमावायचं आहे," सुलतान म्हणाला, "गायीचं मुंडकं इथं आमच्या हकुमानं तोडलं जाईल. आपण ते परत जोडून गाय जिंदा करायची. नहीं तो, आपके गर्दनसे सिर अलग किया जाएगा।" कठोर स्वरात सुलतानाने एका सैनिकाला गाय आणून तिचं मस्तक धडावेगळं करायचा हुकूम दिला.

**टाळ मृदंग विणे सुस्वर । नादें दुमदुमिलें अंबर**
**त्यांतही टाळियांचा गजर । अपरंपार ओढवला**

**तंव तेथें अविंधें केलें काय । कीर्तनरंगीं वधिली गाय**
**नामदेवासी बोलिला काय । गातोसी काय कुफराणा**
**धेनु उठविशील येथ । तरी तुझें गायन मानूं सत्य**
**नाहीं तरी तुजही यथार्थ । आपुले हातीं वधीन**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १७५)

नामदेवांचं सर्वांग थरारलं. वारकरी पार घाबरून गेले. नामदेव म्हणाले, "हुजूर, गोमाता, तिचं शिर कापू नका. त्यापेक्षा माझंच शिर कापा. गाय फार पवित्र आहे. तिच्या उदरी ईश्वर निवास करतो. तिचं दूध, तिचं मूत्र, गोमय सारं सारंच औषधी आहे, मानवाला उपयुक्त आहे. तिला मारू नका. त्यापेक्षा माझ्या या जड-शीळ देहाचे तुकडे करा. मी तयार आहे." बीदरचा गृहस्थही आवाज काढून ऊर बडवत रडू लागला. "मीच... मीच याला जबाबदार आहे. मलाच मारून टाका," असे आक्रोश करत सांगू लागला.

बघता बघता गाय आणली गेली. त्या सैनिकाने क्रूरपणे तिचे शीर धडावेगळे केले. गायीनं शेवटचा हंबरडा फोडला.

नामदेव कळवळले, "बंधूंनो, गाय तर कापली. आता भगवंताचा धावा. अश्रू आवरा. म्हणा, जयजय रामकृष्ण हरी, जयजय रामकृष्ण हरी."

**म्हणे देवा ! धांव सत्वर । नामयासी ग्रासूं आला काळ**
**जैसे मीनासी नसतां जळ । होऊनि व्याकुळ तळमळती**
**ऐसें करुणाशब्द ऐकोनि कानीं । तत्काळ पावला चक्रपाणी**
**नामयाचे हृदयभुवनीं । प्रगट झाले तेधवां**

(संत नामदेवांची अभंगगाथा - २०६)

सारे वारकरी सज्ज झाले. 'रामकृष्ण हरी' चा उद्घोष त्यांनी सुरू केला. सारा दरबार उठून उभा राहिला. नामदेवांच्या हृदयी पांडुरंग प्रवेशला. नामदेव निर्धाराने गायीच्या शवाजवळ गेले. खाली बसले. तिला आर्त हाक मारली. "गोमाते, माते ऊठ. तुझं हे वासरू तुला साद घालतंय. माते, मला अनाथ करू नको गं. अगं, तू त्या युगंधराची लाडकी आहेस. त्याची बासरी ऐकून तू धन्य झाली आहेस. त्या यशोदानंदनाची, त्या देवकीनंदनाची, त्या गोपाळाची तुला शपथ आहे. ऊठ, जागी हो." नामदेवांनी त्या गायीच्या अंगावरून, मस्तकावरून मोठ्या प्रेमाने हात फिरवला. बघता बघता त्या गायीचे शीर धडाला जाऊन मिळाले, एकरूप झाले. गाय उठून उभी राहिली. सारा वारकरी समुदाय आनंदाने 'रामकृष्ण हरी' चा उद्घोष करू लागला. नाचू लागला, टाळ्या पिटू लागला. नामदेवांनी गोमातेला वंदन केले. ती गोमाता नामदेवांचे चरण चाटू लागली. देवलोकी तर आनंदीआनंद झाला. श्रीकृष्ण अत्यानंदाने मुरली वाजवू लागले.

सुलतान जागेवरून उठला. त्याने नामदेवांना प्रेमाने दृढ आलिंगन दिले. सारा दरबार म्हणू लागला, "विठ्ठल-विठ्ठल, पांडुरंग."

नंतर ही सर्व मंडळी सुलतानाचा पाहुणचार घेऊन त्या गृहस्थाच्या घरी आली. तिथे नामदेवांनी मोठे रसाळ कीर्तन केले. त्या व्यक्तीचा नवस फिटला. त्याने सर्व मंडळींचा उत्तम पाहुणचार केला. परतीसाठी बैलगाड्यांची व्यवस्था केली. सारी मंडळी पंढरपुरी परतली.

# १८ - नामदेवांचे पंजाबकार्य

संत नामदेव आणि सारी मंडळी पंढरपुरी परतली. गोरोबाकाका निजधामी गेल्याची वार्ता आली. "विठ्ठल विठ्ठल", नामदेवांच्या मुखातून उद्गार बाहेर पडले. त्यांच्या नेत्रांमधून खळकन् अश्रू बाहेर पडले. 'गोरोबाकाका माझ्याहून वयानं ज्येष्ठ. पांडुरंगाचे परमभक्त. त्यांच्यामुळंच माझे डोळे उघडले.' "पांडुरंग पांडुरंग", नामदेव म्हणाले.

नामदेवांनी परत पांडुरंगाची अनुमती घेतली. राजाई, घरची मंडळी आणि जनाबाईंचा निरोप घेतला. भ्रमण करत द्वारकेला आले. यावेळी ते एकटेच होते. द्वारकेला कीर्तन-भजनाची आरास मांडली. कृष्णभक्तीने वातावरण भारून टाकले. तेथून ते सौराष्ट्र, राजस्थान करत मथुरेला आले. गावोगावी ज्ञानदीप प्रज्वलित केले. फिरत फिरत मथुरेला आले. पवित्र यमुनाजळी स्नान केले. नामदेवांची कीर्तने मथुरा, गोकुळ, वृंदावनात रंगरस- गंधांनी भरून गेलेली होती. श्रोते कृष्णभक्ती आणि अद्वैत तत्त्वाची सोपी मांडणी ऐकून धन्य होत होते. तेथून ते अयोध्येला आले. रामजन्म या नगरीत झाला. मर्यादापुरुषोत्तम राम, साध्वी सीता, रामछाया लक्ष्मण, धर्मशील भरत, वायुपुत्र हनुमंत या साऱ्या विश्वाला आदर्श असणाऱ्या व्यक्तींचे नामदेवांना स्मरण झाले.

**राम रमे रमि राम संभारे । मै बलि ताकी छिन न बिसारे**
**राम रमे रमि दीजै तारी । वैकुंठनाथ मिले बनवारी**
**राम रमे रमि दीजै हरी । लाज न कीजै परुवा करी**

**सरीर सभागा सो मोहि भावै । पारब्रह्मका जो गुन गावै**
**सरीर धरें कीं इहै बढाई । नामदेव नाउ न बिसरि जाई**

(संत नामदेव महाराजांचे हिंदी अभंग - ११४)

अयोध्येहून काशी, तेथून हरिद्वार. बद्रीकेदार करून ते मानस सरोवरापर्यंत जाऊन पोचले. त्याच्या जवळच्या शहराणपूर, ज्वालापूरला आले. तेथून ते पंजाबात आले. पंजाबी लोक शूर, धिप्पाड आणि कष्टाळू. या प्रांतातही परचक्राचे दुष्परिणाम पदोपदी जाणवत होते. नामदेवांचे भक्तिरसाने ओथंबलेले मधुर हिंदी. लोक मुग्ध झाले.

**पतित पावन माधऊ बिरदु तेरा।**
**धांनि ते वै मुनि जन, जिन धिआइठ हरि प्रभु मेरा**
**मेरै माथै लागीले धूरि गोविंद चरणन की।**
**सुर नर मुनि जन तिनहु ते दूरि। रहाउ**
**दीन का दइआलु माधौ गरब परिहारी।**
**चरण सरन नामा बलि तिहारी**

(संत नामदेव महाराजांचे हिंदी अभंग - १६)

हा पंढरपूरवाला संत नामदेवबाबा पंजाबमध्ये शहरात, खेड्यापाड्यात 'रामकृष्ण हरी' चा उद्‌घोष करत फिरू लागला. ईश्वराचे दर्शन कसे ते सांगू लागला. डोळ्यांतून भगवंताला अंतरात घ्यावा. सतत नामस्मरण करून त्याला अंतरी स्थापित करावा. त्याला साठवावा, नामस्मरणाने सतत आठवावा. नंतर आपल्या वृत्ती पवित्र होतील हे वेगळे सांगणे नकोच. ईश्वराचा अंतरी असलेला निवासच आपल्याला काम, क्रोध, मद, लोभ, मोह, मत्सर या

षड्रिपूंची बाधा होऊ देणार नाही. जातिभेद, वर्णभेद असे अनिष्ट भाव पार मावळून जातील. आपण एकाच ईश्वराची लेकरं आहोत, हे सत्य आपल्या मनी रुजेल. एकीने, प्रेमाने हा समाजरूपी रथ वैभवाकडे जाईल. वैभव फक्त धनात नाही, तर ते परस्परांवरच्या प्रेमावर आहे. ईश्वराच्या भक्तीचे वैभव खरे वैभव आहे. त्यामुळे व्यक्तिगत आणि सामाजिक चारित्र्याची घडण होणार आहे. हे उदात्त असलेले चारित्र्यवान लोकच या मर्त्यलोकाची कीर्ती त्रैलोक्यात पोचवणार आहेत. सत्याचरण, कर्तव्यपूर्ती आणि प्रामाणिक कष्ट आपण भगवंतसाक्षीने करू, तर प्रपंचाचाच परमार्थ होईल.

वर्षाऋतूत नभातल्या घन-मेघश्यामाने कृपा केली. शेतात कृषीवलाने घर्मबिंदूंचे सिंचन केले. बरोबरीने वृषभही कष्टले. धरणीमाता प्रसन्न झाली. एकेका बीजाच्या मोबदल्यात शेकडो दाण्यांची हजारो कणसे तिने प्रदान केली. माणूस आनंदला, कृतज्ञ झाला. पंढरपुरवाले नामदेवबाबा कीर्तन करण्यासाठी एका मचाणावर उभे राहिले. नामदेवबाबांच्या कीर्तनाला अफाट गर्दी झाली. कीर्तनाला रंग भरायला सुरुवात झाली.

**राम नाम घेती राम नाम वारी । हमारै धन बाबा बनवारी ।। टेक ।।**
**या धनकी देषतु अधिकई । तसकर हरै न लागै काई**
**दह दिसि राम रह्या भरपुरी । सत नि नीयरै साकत दूरी**
**नामदेव कहे मेरे क्रीसन सोई । कूंत मसाहति करै न कोई**

(संत नामदेव महाराजांचे हिंदी अभंग - २०५)

कीर्तन चालू असताना एकदम लुटारूंच्या टोळीची धाड आली.

स्त्री-पुरुष धावू लागले. नामदेवांनी उच्चरवात साऱ्यांना शांत केले. कीर्तन सुरूच ठेवले.

**राम नामै बोलि नृबाण बाणी । जिभ्या आन मिथ्या करि जाण॥ टेक ॥**

**को को न तारे को को न उधारे । बैकुंठनाथ षसम हमारे**
**सोनेकी माल पषाण बेधीला । झीझ फुटी राम नाम अकेला**
**सपत पुरी नौउ षंड भाई । राम बिना कौने गति पाई**
**माटी देषि माटी कहा भुलाना । कहि समझावै दास नामा**

(संत नामदेव महाराजांचे हिंदी अभंग - २१२)

लुटारू लोकांनी नामदेवांची रसाळ वाणी ऐकली. त्यांचा सरदार शांत झाला. त्याने इतर साथीदारांनाही खूण करून शांत बसायला सांगितले. एरवी हे लुटारू, डाकू टोळधाडीसारखे येत. घरातील धन, शेतातील उभे पीक, स्त्रियांच्या अंगावरील दागिने नेत. तलवारी, भाले, कुऱ्हाडी घेऊन येत. त्यांना विरोध करण्याची कोणी हिम्मत केलीच तर त्याची ते खांडोळी करत. नामदेवांच्या अमृतमयी वाणीच्या प्रभावाने, भक्तीच्या भावभिजल्या अभंगांनी ते मुग्ध झाले. त्यांच्या मनातून चोरी, लुटालूट करण्याची इच्छाच नष्ट झाली. कीर्तन झाल्यावर त्या टोळीच्या सरदाराने आणि त्याच्या साथीदारांनी नामदेवांच्या चरणी लोळण घेतली. ''आजसे ये बुरे काम छोड दिये।'' म्हणून शपथ घेतली. शेती वाचली. लुटारूंचे परिवर्तन झाले. ''बल्ले बल्ले बल्ले बल्ले !'' म्हणून उपस्थितांनी भांगडा केला. त्या शेतकऱ्याने सर्वांना भोजनप्रसाद दिला. ती शेतजमीन भागवत धर्माच्या

प्रसारासाठी अर्पण केली. भागवत धर्मप्रसाराचा मठ उभा राहिला.

नामदेवबाबा पंजाबात प्रभाव टाकत होते. ठिकठिकाणी भागवत धर्माची पताका फडफडू लागली. वारकरी संप्रदाय रुजू लागला. साध्यासुध्या भाषेत माणुसकी कशी असते याची त्यामुळे सामान्य जनांना जाण येऊ लागली. खरा धर्म आणि खरे धर्माचरण समजू लागले. भूतपिंड गावी त्यांचे कीर्तन झाले. एक माउली पुढे आली. तिने नामदेवांच्या चरणावर आपले मस्तक ठेवले. ती म्हणाली, ''बाबा, आपण शक्तिशाली आहात. ईश्वरी शक्तीने परिपूर्ण आहात. मी अभागिनी आहे. मला एकुलता एक पुत्र आहे. त्याला उदरव्याधी आहे. आम्ही खूप गरीब आहोत. मोठ्या नामांकित वैद्यराजांकडं जाण्यासारखी आमची परिस्थिती नाही. तरी मी माझ्या ऐपतीनुसार झाडपाल्याचा रस दिला. मुळ्या उगाळून चाटवल्या. उपयोग झाला नाही. तो काही खात नाही. काही खाल्लंच तर फार तळमळत पडतो. आता आपणच याचं सर्वस्व. आपल्या पदरात मी माझा मुलगा घालते.'' नामदेवांनी त्या मुलाला मोठ्या प्रेमाने जवळ घेतले. त्याच्या डोक्यावरून हात फिरवत म्हणाले, ''गाओ बेटा, रामकृष्ण हरी, जय जय रामकृष्ण हरी.'' तो मुलगा केविलवाण्या स्वरात म्हणू लागला, ''रामकृष्ण हरी, जयजय रामकृष्ण हरी.'' नामदेव त्या माउलीला म्हणाले, ''माताजी, आपण आता निश्चिंत राहा. या मुलावर भगवत्कृपा होईल. हा व्याधिमुक्त होईल.'' तो मुलगा नामदेवबाबांबरोबर नित्य भ्रमण करू लागला. 'रामकृष्ण हरी' चा जप करू लागला. कीर्तनात टाळ वाजवू लागला. गायनात भाग घेऊ लागला. भोजनप्रसाद सेवन करू लागला. त्याची उदर व्याधी,

पोटशूळ कधी गेला ते त्यालाही कळले नाही. तो नामदेवांचा शिष्य झाला. नामदेवांनी त्याचे 'बहोरदास' असे नामकरण केले.

नामदेव भूतपिंडाहून भट्टीवालला आले. हा दुष्काळी पट्टा होता. अनियमित पाऊस. पाण्याविना पशुपक्षी, माणूस सारेच हैराण. गाव लहान, पण असलेल्यांसाठीही पुरेसे जल नाही. नामदेवांनी कीर्तन केले. कीर्तन झाल्यावर लोकांचे दारिद्र्य, पाण्याविना होणारे हाल यांचे वर्णन तिथल्या लोकांकडून ऐकत. आता नामदेवबाबांची ख्याती साऱ्या पंजाबभर पसरली होती. त्यांच्या प्रेरणेने मठ, आश्रम, देवळे अशा संस्था उभ्या राहात होत्या. त्या संस्थांच्या द्वारे एकीचा, अद्वैतवादाचा प्रचार होत होता. "रामकृष्णाच्या साक्षीने प्रपंच, व्यवसाय करावा. जातपात मानू नये, प्रामाणिकपणा सोडू नये, परस्त्रीला रुक्मिणी मातेसमान मानावे, हरी आणि हर एक आहे, परनिंदा करू नये, परोपकार करावा. हरिनाम, रामनाम अखंड घ्यावे. संतसेवा करावी." अशा बहुमोल विचारांचा प्रचार केला जात होता.

कीर्तन झाल्यावर गावकऱ्यांनी नामदेवांना नमस्कार केला. त्यांच्या चरणावर डोई ठेवली. एक वृद्ध गृहस्थ पुढे झाला, "बाबा, आपला प्रत्येक शब्द अंतरात कोरून ठेवण्यासारखा. प्रत्येक विचार मोलाचा. पण बाबा, या गावात पाऊस कमी. नदी, तलाव, विहीर काही नाही. उताण्या जमिनी पाण्याविना हिरव्या कशा व्हाव्यात ! हे गावच सोडावं. दुसऱ्या गावी जावं. काही कष्ट करून पोट भरावं, असं आता बऱ्याच गावकऱ्यांच्या मनात येऊ लागलंय. तरुण लोक, लेकरंबाळं जातीलही. पण आमचा उभा जन्म इथं या गावात गेला. आमच्या आज्या-पणज्यापासूनच्या आठवणी आहेत इथं. जुनं घर

आहे. अनेकांची घरं लहान आहेत, झोपड्याही आहेत. पण त्या मायेच्या आहेत. पूर्वजांच्या हस्तस्पर्शानं पावन झालेल्या आहेत. त्यांचे दर्शन देत त्या उभ्या आहेत. त्यांच्या आठवणींनी त्या भरलेल्या आहेत. हे सारं सोडून जायचं म्हणजे....'' त्याला पुढे बोलवले नाही. ओंजळीत तोंड घालून तो हुंदके देऊ लागला.

नामदेवांनी त्या वृद्धाला हात जोडून नमस्कार केला. ते म्हणाले, ''आजोबा चिंता करू नका. हे गाव, तुमचं घर, तुम्हांला सोडून जावं लागणार नाही. तुम्ही इथंच राहायचंय. माझा विठ्ठल, माझा पांडुरंग करुणासागर आहे.'' त्यांनी श्रोतृवर्गातल्या जाणत्या लोकांना, तरुणांना जवळ बोलावून विचारले, ''समोर शेताजवळ उजाड जमीन दिसतीय ती कोणाच्या मालकीची आहे ?'' ''नाही, ती कोणाच्याही मालकीची नाही,'' एक ज्येष्ठ गृहस्थ म्हणाले. ''तीच माझ्या पांडुरंगाची जमीन,'' नामदेव म्हणाले, ''आपण ती जमीन खणूया. कष्ट करूया. पांडुरंग ती कृपामृतानं भरून टाकेल.'' नामदेव असे म्हणताच पहारी, कुदळी, फावडी, पाट्या जमल्या. श्रमदानाला सुरुवात झाली. ''रामकृष्ण हरी जयजय रामकृष्ण हरी'' चा उद्घोष करत खणायला आरंभ झाला. मोठे गोलाकार खोदून झाले. नामदेव नेत्र मिटून त्या विठ्ठलाचा धावा करत होते. ''रामकृष्ण हरीचा'' समूहस्वर सुरू होताच. बघता बघता खोदलेल्या भूमातेला उमाळे फुटले. स्फटिकासारख्या स्वच्छ जलाने तो तलाव पुरता भरून गेला. लोक आनंदाने उड्या मारू लागले. एकमेकांना आलिंगन देऊ लागले. नामदेवांच्या चरणी लोळू लागले. मुखाने गाऊ लागले, ''रामकृष्ण हरी जय जय

रामकृष्ण हरी.'' नामदेवबाबांची कृपा झाली म्हणून त्या तलावाचे नाव ठेवले 'नामियांना'.

पंजाबात कार्य सुरू होते. आता नऊ-साडेनऊ वर्षे झाली. त्यांना परत पंढरीचे स्मरण झाले. किती काळ लोटला ! पंढरपूर, माझा सखा पांडुरंग माझी प्रतीक्षा करत असेल ! माझे सारे आप्त ! पंजाबचा निरोप घेऊन नामदेव निघाले. येताना परत काशीला आले. विश्वेश्वराचे दर्शन घेतले. मोठ्या ओढीने पंढरपुरी निघाले.



# १९ - ईशनाम ज्याचे चित्ती

नामदेवांचे पंजाबक्षेत्री कार्य सुरू होते. वारकरी संप्रदाय त्या प्रांती पोचत होता. 'नामदेवबाबा' लोकांच्या हृदयाचा ठाव घेत होते. राजाईचा संसार सुरू होता. नेत्र मात्र पतीच्या आगमनाकडे होते. नामदेवभगिनी आणि शिष्या जनाबाई ईशभक्तीत सारा भाव समर्पित करत होत्या.

**ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी**
**उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें**
**तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी**
**आंगा आपुले ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं**
**ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी**

(संत जनाबाईंचे अभंग)

या ईशसंकीर्तनामुळे जनाबाईंना कधी कष्टांची जाणीव झाली

नाही. राजाई आणि सर्वांनाच तिचा मोठा आधार होता. जनाबाईंना आधार साक्षात पांडुरंगाचा.

**झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणि**
**पाटी घेऊनियां शिरीं । नेऊनियां टाकी दुरी**
**ऐसा भक्तिसी भुलला । नीच कामें करूं लागला**
**जनी म्हणे विठोबाला । काय उतराई होऊं तुला**

(संत जनाबाईंचे अभंग)

उत्सवाची सांगता, त्याचा भोजनप्रसाद. धान्य दळून देण्याची सेवा जनाबाईंची. जात्यावर बसून दळत होत्या. लोकांची रात्रीची जेवणे होऊन निद्रादेवीची आराधना सुरू झाली. घरोघरीचे कंदील, चिमण्या असे दिवे मालवले गेले. जनाबाईंच्या झोपडीत चिमणी जळत होती. जात्याची घरघर सुरू होती. वैखरी विठ्ठनाम घेत होती. इतक्यात झोपडी तेजाळली. स्वयं पांडुरंग आला. आला तो थेट खाली बसून जाते फिरवायला मदत करू लागला. जाते वेगाने फिरू लागले. पोते रिकामे झाले. त्यातच दोघांनी दळलेले पीठ भरून ठेवले. दोघेही पार दमून गेले. पांडुरंग आडवे झाले. क्षणार्धात त्यांना गाढ निद्रा लागली. नेत्र मिटलेले, प्रसन्न मुद्रा, निद्रिस्त भगवंतांच्या मुखावरचे वत्सल भाव. जनाबाईंनी त्यांच्या अंगावर वाकळ पांघरली. भिंतीला टेकून त्याही झोपल्या. पहाटसमयी भगवंतांना जाग आली. लगबगीने ते मंदिरात आले. कटेवरी कर ठेवून विटेवरी स्थित झाले. पुजारी पूजासाहित्य घेऊन गाभाऱ्यात आले. पहिली पुष्पे, आधीचे तुळशीहार काढावेत म्हणून पुढे सरसावले. त्यांना विस्मयाचा धक्काच

बसला. विठ्ठलाच्या स्कंधावर रेशमी शेला नाही. त्याजागी आहे वाकळ. विठुरायाच्या स्कंधावर वाकळ ! थोडे निरखून पाहिले, तर कंठामध्ये रत्नहारही नाही. पुजाऱ्यांनी हा प्रकार मंदिरप्रमुखांना कथन केला. त्यांनी ही गोष्ट ग्रामाधिकाऱ्यांना सांगितली. ग्रामाधिकाऱ्यांनी सैन्याधिकाऱ्याला तपास करण्याची आज्ञा दिली. गावातील घरांचा तपास सुरू झाला. त्यात जनाबाईंचे खोपट तपासले. जनाबाईंच्या खोपटात जात्याजवळच्या भिंतीलगत भगवंताचा रेशमी शेला आणि शेल्यात अडकलेला रत्नहार सापडला. शिपायांनी जनाबाईंना ग्रामाधिकाऱ्यांसमोर हजर केले.

"जनाबाई, तुमच्या खोपटात पांडुरंगाच्या खांद्यावरचा शेला आणि रत्नहार मिळाला, ही गोष्ट खरी आहे ना ?" अधिकाऱ्यांनी विचारले. जनाबाईंनी होकार दिला. "ईश्वराच्या वस्तू चोरणं हा घोर अपराध आहे, हे तुम्ही जाणत नाही ?" त्यांनी विचारले. जनाबाई म्हणाल्या, "हार आणि शेला माझ्या विठुमाउलीचाच आहे. काल रात्री भगवंत माझ्या खोपटात आले. नको नको म्हणत असताना ते मला जात्यावर दळू लागले. आम्ही दोघांनी मिळून पीठ पोत्यात भरलं. भगवंत थकले. अंमळ आडवे झाले. क्षणार्धात त्यांना निद्रा लागली. त्यांना मी वाकळ पांघरली. पहाटे ते मंदिरात परतले. त्यावेळी त्यांच्याबरोबर वाकळ गेली. शेला आणि रत्नहार माझ्या खोपटात राहिला." ग्रामाधिकाऱ्यांचे डोळे मोठे झाले. "वा, कथा मोठी छान रचलीत. अशा खोट्या गोष्टीवर कोणाचाच विश्वास बसणार नाही. आज सूर्यास्तापूर्वी यांना या महापापाबद्दल सुळावर चढवा," त्यांनी आज्ञा दिली.

वार्ता गावभर पसरली. राजाईला तर धक्काच बसला. ती आणि तिची मुले, सुना, नातवंडे सारीजण चंद्रभागेच्या वाळवंटाकडे धावली. वाळवंटातच सूळ उभा केला गेला. सारे वाळवंट लोकांनी फुलून गेले होते. जनाबाई शांत उभ्या होत्या. मनी पांडुरंगाचा धावा सुरू होता. आपण निरपराध आहोत. आपले सत्य या लोकांना पटत नाही. चोरीचा भयंकर आळ आपल्यावर आला. वैखरीने विठ्ठलनाम घेत मृत्यूला सामोरे जावे म्हणून त्या सुळाजवळ गेल्या. सुळाला स्पर्श होताच सूळ पार वितळून गेला. त्याचे पाणी-पाणी झाले. बाजूला बुक्याचा आणि सुगंधी पुष्पांचा सडा पडला. पुजारी आणि ग्रामाधिकारी पश्चात्ताप पावले. त्यांनी जनाबाईंच्या चरणावर लोळण घेतली. जनाबाई नेत्र मिटून म्हणत होत्या, 'विठ्ठल-विठ्ठल पांडुरंग.' राजाई धावत आली. तिने जनाबाईंना दृढ आलिंगन दिले. खूप बोलायचे होते. पण अधर मूक होऊन थरथरत होते. मनातले भाव आनंदाश्रू सांगत होते. चंद्रभागेच्या मनीचा ताण मोकळा झाला. ती अत्यानंदाने खळखळ वाहू लागली. वाऱ्याने सारा बुक्का आणि फुले सभोवताली पसरवून आपला हर्ष व्यक्त केला. साऱ्या जमलेल्या मंडळींनी जनाबाईंचा उच्चस्वरात जयजयकार केला. मनोमनी जनाबाई गात होत्या,

**माझा शिणभाग गेला । तुज पाहतां विठ्ठला**
**पाप ताप जाती । तुझें नाम ज्याचे चित्तीं**
**अखंडित नामस्मरण । बाधूं न शके तया विघ्न**
**जनी म्हणे हरिहर । भजतां वैकुंठीं त्या घर**

(संत जनाबाईंचे अभंग)

नामदेव पंढरपुरी परतण्याआधी तीन-चार आठवडे आणखी एक भयंकर घटना घडली. मंगळवेढ्यात गावकूस बांधण्याचे काम निघाले. त्या कामासाठी माणसे सक्तीने नेणे सुरू झाले. त्यात चोखोबांना धरले. चोखोबा जीव तोडून सांगत होते, ''मला माझ्या पांडुरंगापासून दूर नेऊ नका. मला इथंच राहू द्या. इथं मी पडतील ती कामं करीन, कष्ट करीन पण मला या पंढरीतून बाहेर काढू नका.'' त्यांचे कोणी ऐकले नाही. बळाचा वापर करून जबरदस्तीने त्यांना मंगळवेढ्याला नेले. गावकूस बांधण्याचे काम सुरू झाले. चोखोबांचे शरीर मंगळवेढ्यात पण मन मात्र पंढरपुरात. मुखाने सदैव 'रामकृष्णहरी.' तीनचतुर्थांश गावकुसाची भिंत बांधून झाली होती. त्या रात्री सगळे मजूर दमून, भाकर खाऊन त्या भिंतीलगत गाढ झोपले होते. दहाबारा मजूर होते. तीच रात्र काळरात्र ठरली. प्रचंड वादळ झाले. दमून झोपलेल्या मजुरांना कष्टानंतरची निद्रा लागली होती. त्यांना जाग येण्याआधी ती भिंत कोसळली आणि तिच्या ढिगाऱ्याखाली असलेले सारे लोक... त्यात चोखोबा होते.

पंढरपुरी वार्ता आली. दुःखाचा कडेलोट झाला. सोयराबाईंवर दुःखाचा डोंगर कोसळला. पतिनिधनाची वार्ता कळल्यावर त्यांची शुद्ध हरपली. कर्ममेळा पार कोसळून गेला. बंका, निर्मळा धावून आले. जनाबाई, राजाई चोखोबांच्या कुटुंबाला भेटायला गेल्या. तिथले दुःख पाहून त्याही दोघी अश्रूंमध्ये भिजून गेल्या. अनेकांच्या अंगावर दगडमातीची प्रचंड भिंत कोसळलेली. रक्तमांस आणि हाडे दगडमातीच्या ढिगाऱ्याखाली. सारेच भयंकर आणि विचारांपलीकडले.

हळूहळू दुःखाची तीव्रता कमी होत होती. नामदेव लवकरच

पंढरपुरी परत येत असल्याची वार्ता आली. पंढरपुरातल्या वारकऱ्यांच्या मनी त्याही परिस्थितीत एक उत्साह-लहर आली. ज्या दिवशी नामदेव यायचे त्या दिवशी टाळ, मृदंग घेऊन वारकरी वेशीवर आले. खांद्यावरच्या भगव्या पताका हळूहळू वरखाली होऊ लागल्या. दहावीस भक्तांसह नामदेवांनी पंढरपुरात प्रवेश केला. नामदेवांचा जयजयकार झाला. राजाई, जनाबाई, सारे कुटुंबीय या समुदायात होते. एकेकाला भेटून क्षेमकुशल मोठ्या प्रेमाने विचारत होते. ''चोखोबाकाका दिसत नाहीत. ते कुठं आहेत ?'' नामदेवांनी एका वारकऱ्याला विचारले. वारकरी उत्तर न देता हुंदके देऊन रडू लागला. दुसरा एक वृद्ध वारकरी म्हणाला, ''नामा, आरं आपला चोखा कायमचा आपल्याला सोडून गेला.'' हे ऐकून नामदेवांना भोवळ आल्यासारखे झाले. त्यांना इतरांनी सावरले. कितीतरी वेळ ते 'चोखोबा.... चोखोबा' म्हणत रडत राहिले. चोखोबांचा मृत्यू किती दुर्दैवी होता, हे ऐकून ते उद्विग्न झाले. ''सोयराबाई, कर्ममेळा, निर्मळा, बंका यांना कसा भेटू ? यांचं सांत्वन कसं करू ? पांडुरंगा, काय वेळ आणलीस ही ?''

नामदेव पांडुरंगाच्या राउळी आले. फार मोठ्या अंतराने घडणारी भेट. हात जोडून नामदेव पांडुरंगासमोर उभे राहिले. डोळ्यांमधून अश्रूंचा पूर वाहात होता. अनेक गोष्टी व्यक्त करण्यासाठी ओठांची थरथर सुरू होती. पण शब्दच फुटत नव्हते. शेवटी नामदेवांच्या मुखातून शब्द बाहेर आले, ''देवा, क्षेमकुशल विचारू, का चोखोबांबद्दल बोलू ? चोखोबांसारखा भक्त मिळायचा नाही. पांडुरंगा, आपण फक्त बघत राहिलात ! तो आपलाच परमभक्त होता ना, देवा,

तुमच्याकडं तुम्ही बोलावून घेतलंत, पण आमचं काय ?'' विठ्ठलनेत्रांमध्ये अश्रू उभे होते. तो भक्तवत्सल म्हणाला, ''चोखोबा या जगतात आले आणि गेले. ते भक्तिरूपात उरले. खरं सांगू, ते आलेही नाहीत, गेलेही नाहीत ! नामा, तूही यातलं गमक जाणतोस. शरीराचं वस्त्र म्हणजे चोखोबा नव्हेत. चोखोबा हा भक्तीचा निर्मळ प्रवाह आहे. तो आलाही नाही, गेलाही नाही. तो चिरंतन आहे. सगुण साकाराचंच जग आहे, म्हणून देहाच्या आकृतींवर ममत्व. नामा, माझी एक इच्छा आहे. ती तूच पूर्ण करायची आहेस. तुला माझी विनंती आहे.'' नामदेव गहिरवले. ते म्हणाले, ''देवा, आपण आज्ञा करावी.'' ''नामा, या चोखोबांच्या अनन्यभक्तीचा वस्तुपाठ लोकांसमोर राहावा. लोक माझं दर्शन घ्यायला येतात. माझं देवत्व अशा अलौकिक भक्तांमुळंच आहे. तू मंगळवेढ्याला जा. चोखोबांच्या अस्थी घेऊन ये. माझ्यासमोर, या महाद्वारात त्यांची समाधी बांध,'' भगवंत म्हणाले. विशालहृदयी भगवंत. नामदेव कितीतरी वेळ त्या भक्तवत्सलाकडे धन्य होऊन बघत राहिले. ''देवा, आपली विशालता गगनाहून, या विश्वाहून व्यापक आहे. शब्दांनी अपुरं पडावं आपलं वर्णन करायला ! देवा, दहाबारा लोक त्या भिंतीच्या ढिगाऱ्याखाली चिरडले म्हणतात. त्यात चोखोबांच्या अस्थी ?...'' नामदेवांनी विचारले. भगवंत म्हणाले, ''नामा, तुला हे सुद्धा मीच सांगू ?'' नामदेवांनी भगवंतांच्या चरणावर मस्तक ठेवले. भगवंतांच्या नेत्रांमधील दोन अश्रू नामदेवांच्या मस्तकावर पडले.

नामदेव मंगळवेढ्याला आले. अजून दगडमातीचा मोठा ढिगारा होताच. मांस-अस्थीचे शुष्क तुकडे विखुरलेले होते. नामदेवांच्या

मुखातून "चोखोबा," असे उद्‌गार प्रकट झाले आणि त्यांना हुंदका आला. एकेक अस्थी उचलून बघू लागले. चोखोबांची अस्थी हातात आली की सुगंध येत होता आणि त्यातून ध्वनी उमटत होता, "विठ्ठल-विठ्ठल." मातीच्या लोटक्यात अस्थी गोळा झाल्या. नामदेव पंढरपुरी आले. नामदेव मंदिरप्रमुखांकडे आले. त्यांनी त्यांना पांडुरंगाची आज्ञा सांगितली. मंदिरप्रमुखांना ते पटणे शक्यच नव्हते. त्यांनी साफ नकार दिला. दुसऱ्या दिवशी वारकरी मंडळी, चोखोबांच्या घरची मंडळी अशा सर्वांना घेऊन नामदेव मंदिरप्रमुखांकडे आले. मंदिरप्रमुख थोडे घाबरले. काय करावे ते त्यांना सुचेना. त्यांना पटकन एक युक्ती सुचली. ही मंडळी दरिद्री आहेत. यांना मोठी रक्कम मागू. ते म्हणाले, "जागा देतो. पण महाद्वारातली जागा आहे. तिचं मोल मोठं आहे. तुम्ही एक सहस्र सुवर्णनाणी आणून द्या. जागा तुमची." नामदेवांना मोठा प्रश्न पडला. हे आपण कोठून कसे आणणार ? सारी मंडळी निराश होऊन परतली.

विजय प्राप्त केल्याच्या आनंदात मंदिरप्रमुख घरी आले. दुपारची भोजनवेळ झालेली होती. त्यांच्या पत्नीने त्यांना वाढले. चंदनाचा पाट बसायला. चांदीची ताटवाटी. वरण-भात, त्यावर तूप. लिंबू, भाजी, कोशिंबीर, चटणी, आमटी. एका स्वतंत्र वाटीत खीर. तूप लावलेल्या गरम पोळ्या. मोठा साग्रसंगीत बेत होता. बघूनच ते खूश झाले. भात कालवून त्यांनी घास तोंडाकडे नेला. तोंडाकडे आल्यावर त्या घासाचे झाले सुवर्णनाणे. पोळीचा घास तोंडाकडे नेला. त्याचेही सुवर्णनाणे झाले. खिरीची वाटी तोंडाकडे नेली. तिच्यातही खिरीऐवजी सुवर्णनाणी झाली. घास तोंडाकडे नेल्यावर

सुवर्णनाणे आणि खाली ठेवल्यावर अन्न. त्यांना खाताच येईना. शेवटी त्यांनी पाणी पिण्यासाठी भांडे उचलून ओठाजवळ नेले. त्यातही सुवर्णनाणीच. संतापून ते उठले. पत्नीला ते असे का उठले ते कळेना. शेवटी ते जरा आडवे व्हावे म्हणून मऊ अंथरुणावर पडले. अंगाला खूप टोचू लागले म्हणून पटकन उठले. बघतात तो अंगाखालीसुद्धा सुवर्णनाणीच. मग त्यांच्या लक्षात आले. आपण संतांना, देवभक्तांना नकार दिला. ते तसेच उठले. धोतर सारखे केले, अंगरखा चढवला. डोईवर पगडी घालून थेट नामदेवांच्या घरी गेले.

नामदेव अस्वस्थपणे येरझाऱ्या घालत होते. मुखाने विठ्ठलनाम घेणे सुरूच होते. मंदिरप्रमुखांनी सरळ जाऊन नामदेवांचे पायच पकडले. ‘‘आम्ही चुकलो, आम्हांला क्षमा करा. आपले सामर्थ्य ठाऊक असूनही आम्ही आपल्याला नकार दिला. बांधा, चोखोबांची महाद्वारात समाधी बांधा.’’ नामदेवांनी त्यांना उठवले, त्यांना प्रतिनमस्कार केला. त्यांच्या नेत्री आनंदाश्रू आले. महाद्वारात चोखोबांची समाधी बांधली गेली. संतमंडळी आणि स्वयं विठ्ठलाला परमानंद झाला. नामदेव कृतकृत्य झाले.

**आनंदे वोविया तुम्हांसी गाईन । जीवें भावें वोवाळीन पायांवरी**
**सुकुमार साजिरीं पाउलें गोजिरीं । ते हे मिरवलीं विटेवरी**
**कटावरी कर धरोनी श्रीहरी । उभा भीमातीरीं पंढरीये**
**महाद्वारीं चोखा तयाची बहीण । घाली लोटांगण उभयतां**

(संत निर्मळा- अभंग)



# २० - संत नामदेव विठ्ठलरूप जाहले।

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा
पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा॥ १ ॥
जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा राहीच्या वल्लभा पावे जिवलगा ॥ धृ० ॥
तुळसीमाळा गळां कर ठेवून कटीं । कासे पीतांबर कस्तुरी लल्लाटीं
देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहती॥ २ ॥
ओंवाळूं आरत्या कुरवंड्या येती । चंद्रभागेमाजीं सोडुनियां देती
दिंड्या पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णू मी किती ॥ ३ ॥
आषाढी कार्तिकी भक्त जन येती । चंद्रभागेमाजीं स्नानें जे करिती
दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ॥ ४ ॥

(संत नामदेवांची अभंगगाथा - २३६६)

संत नामदेवांनी त्यांच्या सख्याची, पांडुरंगाची मोठी भक्तिरसपूर्ण आरती लिहिली. संत नामदेवांनी ज्ञानेश्वर माउलींची आदी आणि समाधी अभंगरूपात आणली. पूर्णब्रह्म अवतार श्रीकृष्ण माहात्म्य लिहिले. त्यांनी श्रीराममाहात्म्य लिहिले. विठ्ठलमाहात्म्य, शिवरात्र माहात्म्य, तुळसी माहात्म्य, शुकाख्यान, राजा हरिश्चंद्रचरित्र, श्रियाळ चरित्र, ध्रुव चरित्र, भक्त सुदाम चरित्र. नामदेवांनी अगणित, अपूर्व आणि अलौकिक असे लेखन केले. नामदेवांचे आत्मनिवेदन, त्यांची आत्मप्रचीती दोन्ही रचना अनुभूती देणाऱ्या, खऱ्या भक्ताची ईशपूर्ण अशी भावावस्था.

सामान्य प्रापंचिकाच्या जीवनात ईश्वराचे साक्षित्व नाही, याचे त्यांना अतीव दु:ख होत असे.

**वीतभर पोट लागलेंसे पाठी। साधूसंगें गोष्टी सांगूं न देई**
**पोट माझी माता पोट माझा पिता। पोटानें ही चिंता लाविलीसे**
**पोट माझा बंधु पोट माझी बहीण। पोटानें हें दैन्य मांडिलेंसे**
**विष्णुदास नामा पोटाकडे पाहे। अजूनि किती ठाय हिंडवीसी**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १४१३)

चौऱ्याऐंशी लक्ष योनी फिरून अंतिमत: सर्वश्रेष्ठ अशा मानवजन्मी आलो. या जन्मात सत्संग केला ? साधू-संत यांची संगत केली ? खरे तर मानव जन्मच साधनेसाठी असतो. साधनेच्या मार्गाने मुक्ती साधायची असते. माणसाला एक वीतभर पोट ईश्वराने दिले. त्यालाच सर्वस्व मानून माणूस त्यासाठीच जीवन झिजवू लागला. प्रथम पोट आणि नंतर अन्य इंद्रियांचे चोचले पुरवण्यातच त्याचे सारे जीवन गेले. ही तर जीवन-मरण चक्रात परत फिरण्याची तयारी झाली. सर्व संतांनी भक्तीचा मार्ग सांगितला. संत नामदेव या भक्तिमार्गात सर्वांना सावध करतात.

**त्यागेंविण विरक्ति प्रेमावांचूनि भक्ती। शांति नसता ज्ञप्ति शोभा न पवे**
**दमनेवांचूनि यति मानेविण भूपति। योगी नसतां युक्ति शोभा न पवे**
**हेतुवांचूनि प्रीति गुणरहित स्तुति। करणीवांचून कीर्ति शोभा न पवे**
**सत्समागमसंगति बाणली नसतां चित्तीं। नामा म्हणे क्षिती शोभा न पवे**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १२०७)

भक्तिमार्गात आसक्ती उपयोगी नाही. अपरिग्रह हा अनासक्तीचा आत्मा आहे. माणूस छोट्या छोट्या गोष्टीत आसक्ती बाळगतो. कृत श्रमाचे ठराविक फल मिळावे अशी अपेक्षा करतो. अपेक्षापूर्ती नाही झाली की तो निराश, दु:खी होतो. म्हणून निरपेक्ष वृत्तीने कर्म अपेक्षित आहे. मिळेल ते फळ स्वीकारण्याची मानसिक तयारी हवी. फळ मिळालेच नाही, तर ते न मिळणेच योग्य होते असे मानून प्रयत्न आणि निष्ठा परत तपासून घ्याव्यात. भक्ती हा प्रेमाचा कळस आहे. ईश्वरावर प्रेम किंवा श्रद्धाच नसेल तर वरवरच्या पूजेला अर्थ नाही. मनापासून ईश्वरावर श्रद्धा हवी. त्याच्या अस्तित्वाबद्दल किंचितही संदेह आपल्या मनी नको. संत नामदेव हा सिद्धांत विविध दृष्टांत देऊन पटवून देतात. देताना आणखी एक पथ्य सर्वांना सांगतात.

**परदारा परधन परनिंदा परपीडन । सांडोनि भजन हरीचें करा**
**सर्वांभूतीं कृपा संतांची संगति । मग नाहीं पुनरावृत्ति जन्ममरण**
**नामा म्हणे नलगे साधन आणिक । दिधली मज भाक पांडुरंगें**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ११९८)

हरीचे भजन करताना परस्त्री, परधन, परनिंदा आणि परपीडन हे निक्षून टाळावे. परस्त्रीकडे वाकडा डोळा करून पाहिले, वासना दृष्टीने पाहिले, तर ते महापाप आहे. परस्त्री मातेसमान मानून तिच्याकडे बघण्याचा दृष्टिकोन शुद्ध आणि पवित्र हवा. दुसऱ्याच्या धनाला स्पर्शही करू नये. आपण कष्टाने मिळवलेले धनच फक्त आपले मानावे. आपल्या जीवनातला खूप वेळ दुसऱ्याची निंदा करण्यात जातो. अशा निंदेने आपलीच जीभ विटाळली जाते. बरे,

ही निंदा असते त्या व्यक्तीच्या माघारी ! त्यामुळे वेळ आणि जीभ दोन्ही फुकट जाण्याशिवाय काही साधत नाही. कधी कधी सूड किंवा आकसापायी आपण दुसऱ्याला त्रास देण्याचा प्रयत्न करतो. त्याचे दुष्कर्म त्याच्यावर सोडावे. त्यासाठी आपण कष्टू नये. त्यामुळे आपल्याच वृत्ती बिघडण्याची शक्यता असते. संत नामदेव या चारही अनिष्ट गोष्टी टाळून हरीचे भजन करावयास सांगतात. संतसंगतीने साधनेत अधिक पावित्र्य येईल. मग आपण सर्वच 'जन्म-मरण' या चक्रातून मुक्त होऊ. संत नामदेव संतसंगतीचे महत्त्व सांगताना वृक्षाची उपमा संतांना देतात.

**जैसा वृक्ष नेणें मान-अपमान। तैसे ते सज्जन वर्तताती**
**येऊनियां पूजा प्राणी जे करीती। त्याचें सुख चित्तीं तया नाहीं**
**अथवा कोणी प्राणी येऊनी तोडिती। तया न म्हणती छेदूं नका**
**निंदास्तुती सम मानिती जे संत। पूर्ण धैर्यवंत साधू ऐसे**
**नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी। जीवाशिवा गांठी पडुनी जाय**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १४७७)

वृक्षाच्या ठायी मान-अपमान नसतो. कोणी येऊन त्याची पूजा करतो. कोणी त्याला धारदार शस्त्राने तोडू पाहातो. वृक्षाला पूजेने आनंद होत नाही की तोडणाऱ्या व्यक्तीला तो, ''बाबा रे, मला तोडू नको,'' असे सांगत नाही. वृक्ष सुखदु:खाच्या पार असतो. वृक्षाप्रमाणेच संत, साधूही निंदेने अस्वस्थ होत नाहीत किंवा स्तुतीने हुरळून जात नाहीत. ते सुखदु:खाच्या पार असतात. अशा साधूची किंवा संताची भेट होणे हे आपल्या जीवनाचे महाभाग्यच. या जन्मी संतभेट झाली

तर जिवा-शिवाची गाठ पडण्याचा मंगल योग साधला असे मानावे.

**गीता हे चि गंगा गुह्यभाव पैं गा । नाम हें चि जगा सोडवण**
**सर्व ब्रह्म हरि सांगत मुरारि । विश्वरूप हरि आपण झाला**
**उपदेश अर्जुना, जनी जनार्दन । अखंड भावना भूतदया**
**नामा म्हणे सर्व आहे हाचि देव । उदार माधव सर्वांभूतीं**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ९८१)

गीता ही साक्षात भगवंतांच्या मुखातून प्रकट झालेली पवित्र गंगा आहे. युगंधर श्रीकृष्ण अर्जुनाद्वारे सर्व जगताला सांगताहेत. जीवन जगण्याचे सार आहे ते. त्या ठिकाणी भेदभावाला स्थान नाही. द्वैतभाव नाही. केवळ मानवा-मानवातीलच नव्हे तर संपूर्ण जीवनसृष्टीचा विचार मोठ्या वात्सल्याने गीता-माउली करते. ती भूतदयेने परिपूर्ण अशी आहे. हा नारायण, हा हरी सर्व विश्व व्यापून राहिला आहे. त्याचे मनोभावे नामस्मरण करावे. त्याने सांगितल्यानुसार जीवनात प्रामाणिक असावे, निर्व्यसनी राहावे, षड्रिपूंना दूर ठेवावे, वृत्ती क्षमाशील असावी, सेवा हा जीवनधर्म असावा, कष्टसिद्ध प्राप्तीत समाधान असावे, अहंकार न बाळगता विचारात व्यापकता असावी, अंतरात ईश्वर असावा आणि मुखात हरिनाम असावेच असावे.

संतश्रेष्ठ नामदेवांनी भारतभ्रमण केले. आपल्या कीर्तनांमधून भागवत धर्माचा प्रचार केला. वारकरी संप्रदायाचा अद्वैत सिद्धांत भरतवर्षात जागोजागी पेरला. भेदमुक्त, भयमुक्त भारत आणि जगत. भक्तियुक्त भारत आणि जगत. प्राचीनतम सनातन धर्माने तर देशांच्या सीमांच्या रेघाही ओढल्या नव्हत्या. जातिभेद, धर्मभेद

काय, त्याने देशभेदही केला नव्हता. त्याची घोषणा होती 'वसुधैव कुटुम्बकम्।' ज्ञानेश्वर माउली म्हणते, 'विश्वचि माझे घर।' या अद्वैताच्या म्हणजेच वैश्विकतेच्या प्रचारार्थ संत नामदेवांनी आपले संपूर्ण जीवन झिजवले. माउलीला दिलेले वचन जिवापाड जपले. वचनपूर्ती हाच ध्यास घेतला. तोच त्यांचा श्वासोच्छ्वास झाला. माउलीने विश्वकल्याणार्थ विश्वात्मक देवाजवळ पसायदान मागितले. संत नामदेवांनीही विष्णुदास भाविकांसाठी ईश्वराला पसायदान मागितले,

**आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां । माझिया सकळां हरीच्या दासा**
**कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । ही संतमंडळी सुखी असो**
**अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकांसी**
**नामा म्हणे तयां असावें कल्याण । ज्यां मुखीं निधान पांडुरंग**

(संत नामदेवांची अभंगगाथा - ८८३)

शके ११९२ मध्ये भूतली अवतरलेले संतश्रेष्ठ नामदेव आता शरीराने थकले होते. ज्या भगवत्कृपेने आपण जन्म घेतला, त्या भगवंतांची ओढ त्यांना लागली. या भगवंतांनी जन्मत:च आपले पिसे लावले. माउली आणि संतमंडळींची साथसंगत मिळाली. माउलींच्या वचनाने आणि पांडुरंगाच्या कृपेने कार्य सिद्धीस गेले. या पांडुरंगाचा निरोप घ्यावा. हे भूवैकुंठ पंढरपूर. या नगरीत पुंडलिकाभेटी परब्रह्म आले. कटेवर कर ठेवून विटेवर उभे राहिले. त्यासभोवती राउळ झाले. या विठुरायाला आपण नैवेद्याचा घास भरवला. हा भक्तवत्सल आपल्याशी गुजगोष्टी करायचा. आता निजधामी जायचे म्हणजे या गावीच्या या देवाचा निरोप घ्यायला हवा. या विचारांसरशी

नामदेवांचे मन जडजड झाले. मनीचा विचार सांगण्यासाठी ते राउळी निघाले. पाय जड, मन त्याहून जड, आतून भावनेचे उमाळे उसळत होते. नामदेव राउळात विठुरायासमोर आले. आल्याआल्या त्यांनी आपले मस्तक त्याच्या चरणांवर ठेवले. चरणांवर अश्रूंचा अभिषेक केला. ''विठ्ठला, पांडुरंगा, रोज तुमचा आठव, पंढरपुरात असलो तर दर्शन नाही चुकलं. जन्म पावला, तुमचीच कृपा. जन्म तुमच्या आणि संतांच्या संगानं पवित्र झाला, तुमचीच कृपा. देवभूमी भरतखंडात जन्म लाभला. जीवन या मंगलमयी भूवैकुंठात गेलं, ही तुमचीच कृपा. आता हे वैकुंठ सोडायचं. परलोकातल्या वैकुंठी जायची वेळ आली.''

**बहु दिवस होतो तुमचे गावीं। आतां कृपा असों द्यावी**
**आम्ही जातों आपुल्या गांवा। विठोबा लोभ असों द्यावा**
**तुझे पायीं माझें मन। तुझे चरण माझा प्राण**
**लिखित पत्र पाठवावें। माझें स्मरण असों द्यावें**
**नामा म्हणे जी केशवा। अखंड प्रेमभाव द्यावा**

(संत नामदेवांची अभंगगाथा - १६१५)

शके १२७२, आषाढ शुद्ध एकादशी ठरली. घरामधील साऱ्यांना त्यांनी कल्पना दिली. साऱ्यांना दुःख झाले. साऱ्या घरात दुःखाची छाया पसरली. जनाबाई मात्र शांत होत्या. राजाई त्यांच्या कुशीत शिरून रड रड रडली. तिने आपल्या पतीला सर्वांनी मिळून अडवावे असे सुचवले. जनाबाई म्हणाल्या, ''माझे बंधू आणि गुरूंनी घेतलेला निर्णय अयोग्य असणार नाही. त्यांच्या मार्गानेच मीही

जायचे निश्चित केले आहे.'' राजाई आणि अन्य कुटुंबियांचाही निर्धार झाला.

आप्तांचा निरोप घेऊन नामदेव निघाले. विठ्ठलमंदिरी आले. त्याचे अखेरचे दर्शन घेतले. मंदिराच्या पायऱ्या उतरून खाली आले. शेवटच्या पायरीवर मस्तक ठेवून प्रयाणसंकल्प होता. पायरीवर मस्तक ठेवणार तोच त्यांना मधुरोत्तम आश्चर्याचा धक्का बसला. समोर ज्ञानेश्वर माउली. नामदेव धन्य-धन्य झाले. मुखातून उद्‌गार निघाले, ''माउली, आपण ! आपणही दर्शन दिलेत. मी भरून पावलो. माउली, मी आपल्याला वचन दिलं होतं. तुमच्या अपेक्षेप्रमाणं माझ्या हातून कार्य संपन्न झालं ना ?'' प्रसन्न स्मितहास्य करत ज्ञानदेव म्हणाले, ''अपेक्षेहून कितीतरी अधिक कार्य आपण संपन्न केलंत. नामदेवा मी तुमचा जन्मजन्मांतरीचा ऋणी आहे.'' नामदेव त्यांच्या पायी डोई ठेवायला गेले आणि सारंच अंतर्धान पावलं. ''मला दर्शन देऊन माउलींनी मला धन्य केलं. आता पूर्ण तृप्ती झाली,'' नामदेव मनी उद्‌गारले. पहिल्या पायरीवर मस्तक ठेवले. मुखात-अंतरात ''विठ्ठल-विठ्ठल-पांडुरंग, रामकृष्णहरी, विठ्ठल-विठ्ठल-पांडुरंग....'' नामदेव विठ्ठलरूप झाले.

नामदेव भगिनी आणि शिष्योत्तमा जनाबाई, नामदेव पत्नी राजाई, पुत्र- श्रीनारायण, श्रीविठ्ठल, श्रीगोविंद, श्रीमहादेव, कन्या लिंबाई, भगिनी आऊताई, सुना- गोडाई, येसाई, साखराई सर्वांनी त्याच दिवशी संजीवन-समाधी घेतली. थोरली सून लाडाई गर्भवती होती. ती बाळंतपणासाठी माहेरी कल्याणीला गेली होती. तिला सर्व

वृत्त कळल्यावर तिनेही संजीवन-समाधी घेतली. ही पृथ्वीतलावरची एकमेव आणि अपूर्व घटना आहे.

**कलियुगीं नामा संत साकार। न कळे तो पार ब्रह्मादिकां**
**चहूं युगीं नामा वेगळा नाहीं झाला। म्हणवुनी पुरला नारायण**
**विष्णुदास नामा केशवीं रंगला। देव आत्मा झाला म्हणे परसा**

- संत परिसा भागवत

**''विठ्ठल-विठ्ठल पांडुरंग, जय जय रामकृष्ण हरी,**
**विठ्ठल-विठ्ठल पांडुरंग''**

